## १ . सीट नंबर आठ... काका

पींऽऽऽ पींऽऽऽ प !

बसचा हॉर्न कोकलला, तसा डोळे चोळत पिंटू जागा झाला. आळोखेपिळोखे देत त्याने जडावलेले अंग सैल केले. आपण एस.टी. बसमधून प्रवास करत आहोत याची त्याला जाणीव झाली.

"अजून कितीसा अवकाश आहे हो नाना, घरी पोहोचायला ?" त्याने विचारले.

पण नानांच्या कानी तो प्रश्न पोचण्यापूर्वीच स्वारी खिडकीतून काही तरी पाहण्यात दंग झाली होती. रात्रीच्या अंधारात टक लावून तो त्या दृष्याकडे आश्चर्याने पाहात होता.

"नाना, तो पहा चांदण्यांचा समुद्र . . . अगदी खोल दिसतोय !" न रहावून पिंटूने नानांचे तिकडे लक्ष वेधले.

"हॅट झोपाळू ! आपली बस म्हणजे काय यान आहे का ? चाललीय आपली अंतराळातून आणि पसरल्यात आजूबाजूला चांदण्या ! तळं असेल बहुतेक मोठं ! त्यात दिसत असतील चांदण्यांची प्रतिबिंब!!" पिंटूच्या बडबडीने जागी झालेली प्राची चिवचिवली.

"पण प्राचीताई, आकाशात तरी कुठं दिसताहेत इतक्या चांदण्या ?" इतका वेळ त्यांची गंमत पाहात बसलेल्या नानांनी संभाषणात प्रवेश केला.

"मग, कशी जिरली तायडीची" म्हणून आंगठा दाखवणाऱ्या पिंटूकडे वळून ते म्हणाले, "ते दिसातायत ना, ते आहेत दिवे !"

"पण या जंगलात कशाला ?" पिंटू म्हणाला.

"अरे, बस आता घाटातून चालली असली तरी खाली जंगल नाही काही ! तिथे आहे वसलेलं एक शहर!" नाना म्हणाले.

“त्याचं नाव... ?” प्राचीने विचारले.

“चिपळूण ! आता बस ज्या घाटातून चाललीय त्याचं नाव परशुराम घाट हा घाट उतरला की आपण चिपळूण शहरात पोहोचू.” नानांनी खुलासा केला ! कोकणातील गावं ही डोंगराच्या पायथ्याशी, नाही तर समुद्रकिनारी वसलेली असतात.” प्राचीला बाईच शिकवणं आठवू लागलं.

“पण नाना, मघाशी मी जागी झाले होते तेव्हासुध्दा घाटच चालू होता की, त्याची वळणं तर संपतच नव्हती !” प्राची म्हणाली.

पिंटूला या चर्चेत रस नव्हता. त्याने खिडकीतून बाहेर पाहण्याचा मार्ग चोखाळला.

“तो होता कशेडी घाट” नाना सांगू लागले, “तो रायगड जिल्हयातल्या पोलादपूरपासून सुरू होतो. त्याचं एक वैशिष्टय म्हणजे रायगड आणि रत्नागिरी जिल्हयांच्या सीमा त्या घाटात एक वळणावर एकमेकीला भिडतात. आपण प्रवास सुरू केला तो मुंबईतून आणि कशेडी घाटात रायगड जिल्हा पार करून रत्नागिरी जिल्हयात प्रवेश केला.

“... आणि सध्या आपण चिपळूण एस.टी.स्टॅंडमध्ये प्रवेश करत आहोत.” नानांचे वाक्य अर्धवट तोडून पिंटू उद्गारला.

प्रणेश ऊर्फ पिंटू आणि प्राची तसे पहिल्यांदाच आईबाबांशिवाय प्रवास करत होते. तशी दोघं काही अगदीच लहान नव्हती. प्रणेश होता सहावीत आणि प्राची आठवीत. नानाकाका बरोबर असले तरी त्यांच्याशी ओळख अवघी आठ दिवसांची पण त्या आठ दिवसात दोघेही नानांवर जाम खूष होती. मुलांशी दोस्ती करण्याची कला नानांना साधली होती खरी.

मालवणला कस्टम अधिकारी असलेल्या नाना सामंतांच ब–याच काळाने ऑफिसच्या कामानिमित्त मुंबईत आगमन झालं होतं. काम संपवून ते गावी निघणार तसे गावी घेऊन चलण्याची पिंटू, प्राचीने त्यांना गळ घातली. नाताळची सुटटीही त्यांच्या मदतीला धावून आली. पण बाबांच्या परवानगीचा गड सर करण्याची कामगिरी मात्र नानांनाच पार पाडावी लागली. अखेर सांभाळून राहाण्याचे व इतरांना त्रास न देण्याचे आईला सतरा वेळा वचन देऊन – हो, पिंटूने त्याची मोजदादही केली होती. खाशा स्वा–यांचा प्रवास मुंबई सेंट्रल एस.टी. स्थानकाहून सुरू झाला, तेव्हा नानाकाकांच्या घडयाळात संध्याकाळचे सात वाजले होते.

“किती वाजले हो नाना ?” चिपळूण स्टॅंडवर उतरताच प्राचीनं विचारले.

“दोन” नाना.

"बापरे ! इतकी रात्र झाली ?" पिंटूनं आश्चर्याने विचारले.

"अहं ! पहाट झाली !!" प्राची.

"निम्मं अंतर मागे पडलं आता," त्यांची चकमक मध्येच थोपवून नाना म्हणाले, "हे चिपळूण, यापुढे संगमेश्वर, लांजा, राजापूर, कणकवली ही गावं पार झाली की आपण घरी पोचू. तरी सकाळचे नऊ वाजतात रातराणीला पोचायला."

"या गाडीला रातराणीच का म्हणतात पण ?" पिंटूंचा प्रश्न.

"ती रात्रीचा प्रवास करते म्हणून." नाना

"मग रातराजा म्हणायचं की !" पिंटूने आपले घोडे पुढे दामटले, "आहेच ना डौल एखादा राजासारखा !!"

आतापर्यंत पिंटू प्राचीच्या प्रश्नांना सफलपणे तोंड देणारे नाना आता मात्र निरूत्तर झाले. काय बर उत्तर याचं ! पण फार काळ त्यांना संभ्रमात राहावं लागलं नाही. प्राचीनेच त्यांच्यापुढचा गुंता सोडवला. मनात दबलेले हास्य आता तिच्या ओठातून बाहेर पडले.

"अरे डढढोबा, व्याकरणात तुम्हाला पुल्लिंग, स्त्रीलिंग वगैरे नाही का शिकवलं ? गाडीला कधी 'तो गाडी' किंवा राजाला 'ती राजा' म्हणता येईल का ? ......ती गाडी... ती राणी म्हणून रातराणी !!" प्राचीने पिंटूच्या ज्ञानात भर घातली.

नानांनीही ते ऐकलं आणि एवढीशी साधी गोष्ट आपल्या कशी लक्षात आली नाही असा गमतीचा विचार त्यांच्या मनात डोकावून गेला.

"गाडी कसली, गाडाच म्हणायचा तो !" आपला पराभव अमान्य करत पिंटू कुरबुरला. "कितीसं अंतर तोडलं या गाडयाने ?" त्याने नानांना विचारले.

"२५० किलोमीटरहून सुध्दा जास्त" प्राचीला आपलं ज्ञान दाखवायची संधी मिळाली. रस्त्यावरच्या किलोमीटरच्या दगडांकडे तिचं लक्ष होतं.

पिंटूच्याही ते लक्षात आलं. पण तेवढयान नमेल तर तो पिंटू कसला ! "पण नाना, त्या कि.मी.च्या दगडाशिवाय एन.एच.असं लिहिलेलं बोर्ड चिक्कार दिसले वाटेत..... त्याचा हो काय अर्थ !"

" नुसतं एन.एच. नाही काही. एन.एच. – १७ असं लिहीलं होत. प्रत्येक ठिकाणी." प्राची म्हणाली.

“एन.एच. – १७ म्हणजे नॅशनल हायवे सतरा. दोन राज्यांना जोडणा–या हमरस्त्याला ‘राष्ट्रीय महामार्ग’ म्हटलं जातं हे माहीत असेलच तुम्हाला. मुंबई – गोवा या हायवेला सतरा हा क्रमांक दिलेला आहे.” नानांनी खुलासा केला.

पाय मोकळे करण्यासाठी म्हणून खाली उतरलेल्या मुलांच्या गप्पा आता चांगल्याच रंगल्या होत्या. चिपळूणच्या थंडीला त्यांची बडबड गारठवता आली नाही. तरी ते काम कंडक्टरनं केलं.

“अहो, सीट नं.आठ वाले काका, चढा की आता गाडीत !” खणखणत्या घंटेपाठोपाठ कंडक्टरचे शब्द कानी आले तशी या त्रिकुटाने गाडीची वाट धरली.

गाडीत आपआपली जागा पकडेपर्यंत पिंटू – प्राचीच शब्दकोशात नानांच्या आणखी एका नावाची भर पडली. “सीट नंबर आठ काका !” पण त्यांची ही गंमत नानांना इतक्यात कळणार नव्हती. गाडीने चिपळूण सोडले तसे सारे निद्रादेवीच्या जाळयात गुरफटले. हायवेवरची वाहतूकही थोडी मंदावली होती. मुंबई – मालवण रातराणी मात्र ताज्या दमाने मुक्कामाकडे सुसाटत निघाली.

αααααααααα

## २. हिरव्या चौकटीचा शर्ट

झोकदार वळण घेत बस मालवण एस.टी.डेपोत शिरली. तेव्हा सकाळचे साडेआठ झाले होते. बस थांबली, त्या गचक्यासरशी पिंटू – प्राची जागे झाले. नाना केव्हाच सामान उतरण्याच्या तजविजीला लागले होते. पिंटूने आपली वॉटर बॅग उचलली अन तो दरवाज्याच्या दिशेने सरकला, प्राचीला मागे टाकून आधी उतरण्याचा त्याचा इरादा होता.

पण नाही. चौकटीचा एक शर्ट मध्येच कडमडला. तरीही पिंटूने मुसंडी मारली असती, पण त्याच्या वॉटरबॅगच्या बक्कलने हिरव्या चौकडीशी सलगी केली. 'टर्र...र'. आवाज झाला तसा पिंटू दचकला. वॉटरबॅगच्या बक्कलला आता हिरव्या चौकडीचा एक त्रिकोण लोंबकळत होता.

पिंटूने मागे पाहिले. नानांचे लक्ष नव्हते. प्राचीसुध्दा जड पिशवी उचलण्याच्या पयत्नात दंग होती. मग पिंटुनेही आपण या गावचे नसल्याचा आव आणला. बक्कलला लोंबकळणारा तुकडा त्याने खिशात कोंबला आणि तो पुढे सरकला.

"नशीब बलवत्तर दिसतयं आपलं ! ........सामान काढण्याच्या गडबडीत त्याचं सारं लक्ष गुंतलं असावं ?" पिंटूने स्वतःशीच विचार केला.

हलकेच शीळ घालत तो गाडीतून उतरला. तोच त्याच्या खांद्यावर हात पडला. डोळयाच्या कोप–यातून त्याने पाठीमागे पाहिले... हिरवी चौकट... त्याच्या छातीत धडधडले. आल्या प्रसंगाला तोंड द्यायलाच हवे. तो मागे वळला. पण नाही... हा तर जयू... जयू... नानाकाकांचा मुलगा ! यापूर्वी एकदा तो मुंबईला येऊन गेला होता, तेव्हा त्यांचे छान मेतकूट जमले होते.

"वा ऽ पिंटोबा ! तू आणि प्राची आलात ते छान झालं ! आता सुट्टीत धम्माल येईल!" जयू म्हणाला. पिंटू बिचारा काय बोलणार ! भितीच्या धक्क्यातून तो नुकताच सावरला होता. जयूच्या बोलण्याकडे त्याचे लक्ष नव्हते. त्याने बसकडे पाहिले. हिरवा चौकटवाला रॅकवरून सुटकेस

काढण्यात यशस्वी झाला होता. पण अजूनही तो बसमध्येच गर्दीत अडकला होता. जयूच्या अंगातल्या हिरव्या चौकटच्या शर्टाने पिंटूला उगीच घाबरवले होते.

नाना आणि प्राची सामानांसह गाडीतून उतरले. नानाकाकांचे घर स्टॅंडच्या शेजारीच होते. त्यामुळे गाडी आलेली समजताच जयूची स्वारी स्टॅंडवर हजर झाली होती. सारे घरच्या दिशेने निघाले. पिंटूने मागे वळून पाहिले. हिरवा चौकडीवाला आपल्या सूटकेससह खाली उतरला होता. खिशातून त्याने सिगारेटचं पाकीट काढलं. सिगारेट शिलगवली अन रिकामं पाकीट भिरकावून दिलं.

तसा पिंटू थांबला. ते पाकीट त्याच्याशेजारीच पडलं होतं. त्यानं निरखून पाहिलं. असलं पाकीट आपल्या संग्रहात नाही, पिंटूला जाणवलं. कुणी पाहात नाही ना हे पाहून पिंटूने ते पाकीट उचललं, “ ‘५ ५ ५’ हा नवीन ब्रँड दिसतोय !” तो स्वतःशीच पुटपुटला.

पिंटू मागे रेंगाळला. ते कुणाच्या लक्षात आलं नव्हतं. पाकीट खिशात कोंबून दोन झेपात त्यानं पुढं गेलेल्या मंडळींना गाठलं. या गडबडीत घर केव्हा आलं तेही त्याला कळलं नाही.

“आई” या जयूच्या हाकेसरशी जयूची आई बाहेर आली. पण त्या आधीच चार पायांचा एक केसाळ झुपका पुढे सरकला आणि त्याने ऐटीत जयूच्या खांद्यावर उडी मारली.

“हा रूबी” आपल्या लाडक्या मांजराची ओळख देत जयू म्हणाला.

“ओह.. वा ! पिंटू... प्राची पण आलीयत. बरचं झालं. मुंबईपेक्षा इथे मजेत जाईल तुमची सुटट्टी.” जयूची आई म्हणाली.

पोटपूजा करून बच्चे कंपनी घराचं अधिक संशोधन करण्यात दंग झाली. रूबी तर आल्यापासून त्यांच्याच मागे नाचत होता. माडीवर त्यांच्या गप्पा रंगल्या.

“एखादं तळघर आहे का रे, या घराला?” प्राचीनं विचारलं. “अगं प्राची, अजूनपर्यंत मुंबई सोडली नव्हतीस ना तू, म्हणून गावातलं घर म्हणजे गोष्टीतल्यासारखं तळघर, भुयार, खजिना वगैरेंनी ठासून भरल्यासारखं वाटतंय तुला ! प्रत्येक घराला तळघर थोडचं असतं ? क्वचित जुन्या वाडयांना असतं म्हणा तळघर एखाद्या वेळेस ! जयू म्हणाला.

“तू दिलीस का व्हिजीट कधी अशा तळघराला ?” पाचीनं विचारलं. “निदान जुन्या वाडयाला तरी ? ती म्हणाली.

“माझ्या मामांचा एक वाडा आहे खरा. पण तो खाडीपलीकडे. कर्ली म्हणून गाव आहे

तिथे. त्याला तळघर आहे असं म्हणतात, पण तिथं जायला कधी मिळालं नाही मला जयू म्हणाला.

"आपण जायचं का तिकडे, या सुट्टीत ?" पिंटूनं उत्सुकतेने विचारलं. "नानांना विचारायला हवं. पण नदीपलीकडे जायचं म्हणजे कठिणच. शिवाय ही सुट्टीही कमीच पडेल आपल्याला नुसतं मालवण फिरायला." जयू म्हणाला.

"काय काय आहे इथं पाहाण्यासारखं ?" पिंटू.

"सिंधुदुर्ग किल्ला !" जयूने तोंड उघडण्यापूर्वीच प्राची बोलली.

"हो, किल्ला तर आहेच. शिवाय कोळंब पॉईंट रेकोबाची घाटी, आडारी पॉईंट, जरीमरीचा डोंगर, ओझर जंगल, धामापूरचा तलाव, देवबाग सी-फेस-असे कित्येक स्पॉट भेट देण्यासारखे आहेत. पुन्हा हे शहर समुद्रकिनारी वसलंय ना ! शहाराच्या तीन बाजूंना समुद्र !! प्रत्येक किना-याचं सौंदर्य वेगळचं !!!" थोडं थांबून जयू पूढं म्हणाला, "बंदर किनारा. चिवल्याची वेळ, सर्जेकोट किनारा अशा वेगवेगळया किना-यावर खेळायला मजा येते. 'किनारा क्रिकेट' म्हणून आमचा एक क्लब आहे. थेट वाळूत स्टंप ठोकून आमची फटकेबाजी सुरू होते.

पिंटूपेक्षा प्राचीला क्रिकेटमधे अधिक रस. मग त्यांच्या गप्पांचा ओघ क्रिकेटकडेच वळला. पिंटू मात्र रूबीच्या कसरतीत गुंग होता.

काकूंनी "जेवायला चला" म्हणून पुकारा केल्या तेव्हा कुठे त्यांना पोटातल्या भुकेची जाणीव झाली. नाना एक डुलकी काढून ऑफिसमधे गेले होते, ते थेट रात्री परत येणार होते. त्यामुळे मग तिघांचीच – अंहं  चौघांची, रूबीला विसरून कसं चालेल – पंगत जमली.

"या माशाचं नाव काय नानाकाकू?" पिंटूने आमटीतल्या माशाच्या तुकडयाकडे बोट दाखवत विचारलं.

तसा जयू हसू लागला. "वा ! छान ठेवलंस की आईला !" तो म्हणाला.

काकूंच्या चेह-यावरही हसू फुटले.

"हरकत नाही हो मला तसं म्हणालास तरी – नानाकाकू –" पुन्हा एकवार स्वतःशीच नाव उच्चारून त्या हसल्या तेव्हा पिंटू लाजला. मग ते दडवण्यासाठी पुन्हा एकदा त्याने आपला प्रश्न पुढे रेटला.

कर्ली म्हणतात त्याला. "जयूच्या आईनं खुलासा केला. तेव्हा संभाषणाची गाडी कर्लीच्या वाडयाकडे वळली.

दुपारची झोप आटोपून पिंटू जागा झाला तेव्हा उन्हं उतरली होती. प्राची मात्र अजूनही झोपलेली होती. "जयूचं गार्डनिंग चाललेलं दिसतंय." बाहेर अंगणात नजर टाकून तो पुटपुटला. खाण – चहा झाल्यावर तो जयूच्या मदतीला धावला. .....पण हे काय ? त्याची नजर तर धोका नव्हती ना? त्याने नीट पाहिले. बाजूच्या कंपाउंडमधे हिरव्या चौकडीचा शर्ट घातलेला एक माणूस उभा होता. त्याने खिशातून सिगारेटचं पाकीट काढलं तशी पिंटूला त्याची ओळख पटली. वाढलेला श्वासोच्छ्वास दडपत त्याने जयूला विचारलं, "कोण बरं तुमचे हे शेजारी ?"

"तिथं घर नाही काही कुणाचं ! लॉज आहे एक... कल्पतरू लॉज... असेल तिथं कुणी उतरलेला!" जयू म्हणाला.

'कसली भिती वाटतेय आपल्याला ? काही कारण नाही त्याला घाबरायला!' पिंटूने स्वतःशीच पोक्त विचार केला.

αααααααααα

## ३. चाचा लफित की लफित चाचा

त्या संध्याकाळी बच्चेकंपनीं जरीमरीचा डोंगर पादाक्रांत केला. पण पिंटू मात्र त्या सफरीची इतरांइतकी मजा लुटू शकला नाही. त्याच्या मनाचा एक कोपरा हिरव्या चौकडीनंच व्यापला होता. जरीमरीच्या डोंगरावरून छान निसर्गशोभा दिसत होती. बाजूच्या दरीतून माड – पोफळींच्या बागांनी मखमल पसरल्यासारखे वाटत होते. दूरवर समुद्रात एक काळ पट्टा दिसत होता.

“काय रे, हे ?” पिंटूने विचारले.

“युध्दनौका आहे वाटतं ती !” प्राची उद्गारली.

“छान फसलात ! अरे हाच सिंधुदुर्ग !! आपण शहराच्या दुस–या टोकाला येऊन आणि इतक्या उंचावरून पाहातोय ना, म्हणून तुम्हाला ओळखता नाही आलं !” जयू म्हणाला.

“आपण जायचं का रे, किल्ल्यावर ?” प्राचीन विचारलं.

“जाऊया ना ! उद्या... नको परवा जाऊ ! माझा एक मित्र आहे... अँथनी अल्मेडा... त्याच्याकडच्या नाताळच्या पार्टीचं आमंत्रण आहे ना खास ! चुकवता नाही येणार.” जयू म्हणाला.

पण परवा किल्ल्यावर स्वारी करायचीच ! त्यांनी बेत पक्का केला.

दुस–या दिवशी आपल्याला सुट्टी असल्याचे नानांनी रात्री जाहीर केले तेव्हा त्यांच्याकडून एक गोष्ट वसूल करण्याचा पिंटू – प्राचीने निश्चय केला.

“कशी बरं गोष्ट सांगतील ते ?” त्यांचा खल झाला “कस्टममध्ये काम करतात ना नाना, मग स्मगलरांबरोबर दोन हात करण्याचा प्रसंग आला असेल ना कधी त्यांच्यावर... त्या विषयांवर आपण गप्पा सुरू करू म्हणजे सांगतील ते गोष्ट.” प्राचीने शक्कल लढवली.

रात्री जेवणे उरकल्यावर अंगणातल्या चंद्रप्रकाशात बैठक जमली.

“चाचे दिसतार का हो समुद्रात तुम्हाला, नाना ?” प्राचीने आक्रमण केले.

“स्मगलर म्हणायचं असेल तुला ! जयून भर टाकली.

“तेच ते !” पिंटूला हा अधिक्षेप आवडला नाही. “चाचे काय अन स्मगलर्स काय, दोघेही देशाचे शत्रूच की !!” तो म्हणाला.

“पण एखादा देशप्रेमी चाचा माहिती आहे का तुम्हाला ?” नानाही आता त्यांच्या जुगलबंदीत उतरले.

“आवराआवर करून जयूची आईही आता ओटयावर आली. “बरतारिआच्या चाच्यांची गोष्ट सांगताय वाटतं त्यांना !” संभाषणाचा ओझरता धागा पकडून ती म्हणाली.

तसा “गोष्ट, गोष्ट” प्रणेश – प्राची – जयूने एकच गिला केला.

“सांगतो बर !” अडकित्याने सुपारी कातरत नानांनी गोष्टीला सुरूवात केली.

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातली ही कथा. त्या दरम्यान अमेरिका खंडात एक नवीन राष्ट्र उदयाला येत होतं. त्याचं नाव अमेरिका. त्यापूर्वी अमेरिका म्हणजे केवळ युरोपीय देशांची वसाहत. छोटया छोटया त्या राज्यांना तसं स्वातंत्र्य नव्हतं. हजारो मैल दूर असलेल्या ब्रिटनचं त्यांच्यावर अधिपत्य होतं.

लुइझाना हे असंच एक अमेकिकेच्या दक्षिण किना–यावरलं राज्य. अमेरिकन सरकारनं ते फ्रान्सकडून विकत घेतलं होतं. विल्यम क्लेवॉर्न हे तिथल्या अमेरिकन गव्हर्नरचं नाव. लुइझनाच्याच किना–यावर न्यू ऑर्लिन्स नावाचं एक प्रमुख बंदर होतं. इथल्या बरतारिआ उपसागराच्या मुखाशी चाचे लोकांची राजधानी होती. सारा दलदलीचा प्रवेश ! ‘ग्रँड आलय’ त्यांच नाव. जॉन लफित हा या समुद्री डाकुंचा प्रमुख होता.

एक दिवशी न्यू ऑर्लिन्समधे दवंडी पिटली गेली. ‘लफितला जिवंत वा मृत पकडून देणा–यास ५०० डॉलर्सचे इनाम देण्यात येईल.’ जागोजागी सूचनापत्रके लावण्यत आली. कुणास ठाऊक कसा, पण नागरिकांमध्ये मात्र क्लेबॉर्नपेक्षा लफितच अधिक प्रिय होता. या पत्रकांकडे कुणी ढुंकूनही पाहिले नाही.

आठवडा उलटला आणि क्लेबॉर्नच्या सूचनेखाली एक नवी सूचना झळकली. “गव्हर्नर क्लेबॉर्न याला पकडून ग्रँड आथल येथे आणून देणा–यास १५०० डॉलर्स इनाम मिळेल.”

खाली झोकदार सही होती जॉन लफित –

“वारे, बहादूर ! अगदी शेरास सव्वाशेर निघाला !” प्राची.

"किंवा ठकास महाठक !" जयू.

"मग दिलं का पकडून कुणी गव्हर्नरला ?" पिंटूने विचारलं.

"वा ! आतापासूनच तूम्ही त्या डाकूची बाजू घेऊ लागलात होय ?" नाना हसले आणि पुढे गोष्ट सांगू लागले.

या सूचनेचा परिणाम इतकाच झाला की गव्हर्नर अधिक जळफळला आणि लोकांना मात्र लफितच्या या धाडसाचे या धाडसाचे कौतुक वाटले !

लफितच्या हाताखाली शेकडयांनी माणसे होती. महासागरातील स्पॅनिश आणि ब्रिटीश जहाजावर माल ते सफाईने लुटत आणि न्यू ऑर्लिन्सच्या नागरिकांशी व्यापार करत. अमेरिकन कस्टमचे अधिकारी कित्येकदा त्यांना पकडण्यास येत, पण लफितपुढे त्यांची डाळ शिजत नसे. एक मात्र वैशिष्टय होते. या अधिका–यांना छानशी मेजवानी देऊन नंतर सुखरूप परत पोचवले जाई.

अशातच एक महत्वाची घटना घडली. लफितच्या आयुष्याला तिने वेगळे वळण दिले. इंग्लंडचे अमेरिकेशी युध्द सुरू झाले. इंग्लिश सेनापतीचे लफितकडे मदत मागितली. न्यू ऑर्लिन्स जिंकून देण्यात त्याने मदत केली तर योग्य तो मोबदला चुकवण्याचीही इंग्लिश सेनापतीने भाषा केली. पण लफितला हे आवाहन मानवले नाही. त्याने ही सारी कहाणी क्लेवॉर्नपर्यंत पोचवली आणि वर माफी मिळाल्यास मातृभूमीच्या रक्षणासाठी इंग्लंडविरूध्द लढण्याचा निर्धारही व्यक्त केला.

क्लेवॉर्नचा त्यावर विश्वास बसला नाही. लफितची राजधानी उद्ध्वस्त केली गेली. बरतरिआच्य चाच्यांना दलदलीच्या प्रदेशात दूरवर पिटाळण्यात आल. ज्या मातृभीमीशी लफित निष्ठा व्यक्त करत होता, तिनेच त्याला हे बक्षीस दिलं.

इकडे ब्रिटीश सेनापती पॅकनहेम याने प्रचंड सैन्यानिशी न्यू ऑर्लिन्साला वेढा घातला. क्लेवॉर्नकडे फारसे सैन्य देखील नव्हते. प्रसंग आणीबाणीचा होता. अशा वेळी लफितच देवासारखा त्यांच्या मदतीला धावून आला. आपल्या सा–या सहका–यांसह त्याने बिनशर्त शरणागती पत्करली. पुन्हा एकवार क्लेवॉर्नकडे युध्दात भाग घेण्याची परवानगी मागितली.

सारी अमेरिका त्याच्या देशप्रमाने स्तिमित झाली.

"मग, पुढे काय झालं ?" घसा ओला करण्यासाठी नाना थांबले तसं न राहावून पिंटूनं विचारलं. नानांनी पुढची गोष्ट सांगायला सुरूवात केली.

क्लेवार्नची आता खात्री पटली. लफितच्या देशभक्तीने तो भारावून गेला. लफितने केवळ

ब्रिटिशांनी दिलेली लाच न स्वीकारण्याचा त्यागच केला नाही तर देशासाठी आपले सर्वस्व देऊ केले ! तेही परिणामांची क्षिती न बाळगता.

आपल्या सा-या निग्रो गुलामांना त्याने मुक्त केले. तेही त्याच्या सहका-यांबरोबर युध्दात उतरले. बरीचशी संपत्ती त्याने युध्दखर्चासाठी देऊ केली. लफित आणि त्याच्या सहका-यांनी मोक्याच्या जागा सांभाळल्या. पट्टीच्या नेमबाजांनी ब्रिटीश सैन्याचा बराच नाश केला. लफितच्या सहका-यांनी प्रयत्नांची शर्थ केली. देशप्रेमाचं वारं त्यांच्यात भारलं होतं म्हणाना.

दहा - बारा दिवस युध्द चाललं. अखेर ब्रिटीशांचा पराभव झाला.

आनंदमय विजयोत्सव साजरा झाला.

अमेरिकेचे तेव्हाचे अध्यक्ष जेम्स मॅडिसन यांनी लफितचा खास अल्लेख करून बरतारिआच्या या सा-या नागरिकांना क्षमा केल्याचं जाहीर केलं. लफित आणि त्याच्या सहका-यांच्या शौर्याचं चीज झालं.

"थ्री चिअर्स फॉर द ग्रेट चाचा लफित..." प्राची ओरडली. तिला थांबवून पिंटू म्हणाला, "तसं नाही..."

"थ्री चिअर्स फॉर लफितचाचा, हिप हिप..."

पिंटूची ती चमत्कृती ऐकून जयूची आई हसली. अन् म्हणाली, "अं हं, गोष्ट संपलेली नाही इथे! पुढचं ऐका अन मग ठरवा. चाचा लफित म्हणायचं की लफित चाचा ते!

αααααααααα

## ४ . पिंटूचे स्वप्नरंजन

गोष्ट रंगवून सांगण्यात नानाकाकांचा हातखंडा होता . त्यांनी पाहिलं बच्चेकंपनीचे चेहेरे एकदम टेन्स – काय बरं होतंय पुढं आपल्या लफित चाच्याचं ? सा–यांच्या चेहे–यावरचा प्रश्न नानाकाकांना चक्क वाचता येत होता . तसा हा भला मोठा पॉज संपवून ते पुढे सांगू लागले .

युध्द संपलं ! पुढं काय ? लफितसारख्या धाडसी लोकांना शांत जीवनमान पचलं नसावं . त्यांच्या रक्तातच जणू चाचेगिरी होती की काय, कुणास ठाऊक ? पुन्हा एकवार त्याची जहाजे चाचेगिरीच्या उद्योगास लागली .

आता त्याची राजधानी गॅल्विन्स्टन इथं हलली . अमेरिकन जहाज लुटण्यास मात्र त्यांची बंदी होती . पण त्याच्या सहका–यांनी त्याला जुमानलं नाही . जहाज अमेरिकन असो ब्रिटीश वा स्पॅनिश, लुटणं हाच त्यांचा धंदा .

आता मात्र अमेरिकन सरकारनं कडक धोरण स्वीकारलं . अमेरिकन युध्दनौकेने त्यांच्या वसाहतीवर आक्रमण केलं . त्यांना ‘चालते होण्याची’ आज्ञा फर्मावली . लफितला आपल्याच सरकारविरूध्द लढायच नव्हतं . त्याने त्या आज्ञेचा मान राखला .

आपली सारी वस्ती स्वतःच उद्ध्वस्त केली . पराभूत मनानं मूठभर सहकारी आणि अगणित संपती यासह तो तिथून निघाला . सुसंस्कृत जगाला ज्ञात असलेली लफितबद्दलची ही अखेरची वार्ता . . . . . ! त्यापुढे त्याचं काय झालं हे एक प्रश्नचिन्ह आहे .

“आणि त्याच्या संपत्तीचं...” पिंटूनं विचारलं

“कित्येक दर्यावर्दींनी त्याचं संशोधन करण्याचा प्रयत्न केला . पण आजतागायत त्याचा छडा लागला नाही!” जयूची आई म्हणाली .

“मोठेपणी, तुम्ही करा की प्रयत्न, पिंटोबा !” घडयाळात दहाचे ठोके पडले तसे

नानाकाकांनी भरतवाक्य म्हटले.

त्या दिवशी डोळा लागेपर्यंत मग प्राची – जयूचं संभाषण चाचेगिरीवरच चाललं होतं. पिंटूनं मात्र नानाकाकांचं बोलणं मनावरच घेतलं. त्यानं ठरवलं, मोठेपणी घ्यायचाच भाग खाजिन्याच्या शोध – कार्यात ! त्या विचारात केव्हा झोप लागली तेही त्याला कळलं नाही.

त्या रात्री पिंटूला स्वप्नही जोरदार पडत होती.

"ठो ठो ऽ ....धडाम ऽ धुडूम ऽ जोरदार गोळीबार चालला होता.... त्यातून बेधडक वाट काढत पिंटू आपली लॉंच चालवत होता... मध्येच केव्हातरी लॉंच बूडाली मग पोहत पिंटू समुद्रातल्या बेटाकडे पोचला. तिथे खजिन्याचं रक्षण करणारा साप फिरत होता... 'या प्रणेशसाहेब, तुमचीच वाट पाहात होतो! खजिना तुमचाच आहे.' तो म्हणाला अन आकाशात उडुन गेला.... तशी धप्पकन खजिन्याची पेटी पिंटूसमोर येऊन पडली... धुराचा लोट उसळला... खजिन्याची पेटी आपोआप उघडली... पिंटूने पाहिले... 'लफित' नाव लिहिलेला कागद सर्वात वर होता. पिंटूने तो उचलला. त्या कागदाखाली सगळी सिगारेट पाकिटांची रास होती...... इतक्यात एक केसाळ झुपका तिथे आला. हा तर रूबी... पिंटूने ओळखले... रूबीने ऐटीत सिगारेटचं पाकीट फोडल. सिगारेट तोंडात धरली... एक मनुष्य तिथं आला... त्याने लायटरने रूबीच्या तोंडातली सिगरेट पेटवली. रूबी मजेत सिगारेटचे झुरके घेऊ लागला... पिंटूने वर पाहिले... त्या माणसाच्या अंगात हिरव्या चौकडीचा शर्ट होता... एका हातात लायटर आणि दुसऱ्या हातात भलीमोठी कात्री होती... खीऽ खीऽऽ तो हसू लागला... बरा सापडलास पोरा !... थांब आता तुझा शर्ट मी फाडतो... तो खिदळला... पिंटू घाबरला... त्याने आजूबाजूला पाहिले... समुद्र वाळून आता त्याचं वाळवंट झालं होतं... पिंटूनं धूम ठोकली... तो पळतच होता... हिरवा चौकडीवाला त्याचा पाठलाग करू लागला... इतक्यात नानाकाका विमान घेऊन आले... जाळे टाकून त्यांनी पिंटूला वर उचलून घेतले... तसा पिंटू विमानात बसल्याजागी घोरू लागला... 'अरे पिंटू, उठ... ! तो हिरवा चौकडीवाला दगड मारतोय खालून विमानावर... छे! दगड कुठचे... बॉंम्स आहेत बहूतेक.... अरे उठ ! ..पिंटू, विमान कोसळणार बहुतेक.... नानाकाका पिंटूला उठवत होते.'

पिंटू जागा झाला तेव्हा जयू त्याला जागं करत होता.

हं स्वप्नच सारं.... त्याच्या लक्षात आलं.

"स्वप्नात पळत होतो ना खूप म्हणून दमलो. त्यामुळे उशीर झाला सकाळी उठायला."

त्याने खुलासा केला तेव्हा रागावलेल्या प्राचीच्या चेहे–यावर हसू फुटले.

सुट्टी असल्यामुळे नानांकडून छोटीशी लाँच – सफर लाटता येईल, असा मुलांचा होरा होता. त्यामुळे सकाळच्या प्रसन्न वातावरणात मुलेही प्रसन्न होती. पण त्यांचा हा आनंद फार काळ टिकली नाही. तातडीचा निरोप आल्याने सुट्टी असूनही नानांना ऑफिसमध्ये जावे लागले. "यायला बहुदा रात्र होईल किंवा कदाचित उद्याचा दिवसही उजाडेल." असं सांगून ते निघून गेले.

नानांच्या आणि त्या निरोप्याचा संभाषणावर मुलांच्या चौकस नजरा खिळून होत्या. त्यांने कान टवकारलेले होते. मालवण किना–यावर तसे तुरळक स्मगलिंग चालू असे. पण त्याचे धागेदोरे अद्याप सापडले नव्हते. तशातच एक कुविख्यात स्मगलर मालवणमध्ये येणार असल्याची वार्ता खब–याने आणली. मोठेच घबाड जाळयात सापडण्याची शक्यता होती. त्यामुळे कस्टमखात्यात सारी धावपळ उडाली होती. नानांचीही सुट्टी मग त्या दिवशी रद्द झाली.

त्या संभाषणातून मुलांना ही एवढी माहीती गवसली, तसा स्मगलिंगच्या गप्पांना ऊत आला. अँथनी अल्मेडाच्या आगमानापर्यंत त्या चालूच होत्या. संध्याकाळीच्या पार्टीचं खास आमंत्रण देण्यासाठी तो आला होता. जयूने पिंटू – प्राचीबरोबर ओळख करून दिली.

अँथनीच्या वडिलांची फिशिंग एजन्सी होती. अँथनी हा जयूचा खास वर्गमित्र.

"आज सकाळी रापणीत 'गाधा' मासा सापडला !" तो सांगत होता. "त्यामुळे सा–यांच्या आनंदात भर पडली. दुर्मिळ असतो ना तो ! खरं म्हणजे त्याला मुद्याम पकडलं जात नाही कधी ! पण चुकून असा जाळयात अडकला तर तो शुभशकुन समजला जातो !"

"गाधा मासा म्हणजे रे कोणता ?" प्राचीने जयूला विचारले. पिंटूलाही तो नवीनच होता.

"पाहिल्याशिवाय समजायचं नाही तुम्हाला". अँथनी म्हणाला.

"तसा परिचयाचा असणार तो त्यांच्या ! इंग्लिश नाव सांगितलं की कळेल लगेच !" जयु म्हणाला, "गाधा मासा म्हणजे डॉल्फिन !

"डॉल्फिन" म्हणताच पिंटू – प्राचीने डोळे विस्फारले.

आतापर्यंत डॉल्फिन त्यांनी टि.व्ही.वरच पाहिला होता.

"मला वाटलं होतं. भारतात सापडतात नाहीत ते !" प्राची म्हणाली.

"संपुर्ण भारतात फक्त मालवणच्या किना–यावरच डॉल्फिन सापडतात !" जयू म्हणाला.

"पण मग त्यांचं संरक्षण नको का करायला ?" प्राची.

"म्हणून तर इथं 'मरीन पार्क' उभारण्याची योजना आहे. मालवणला अठरा किलो मीटरचा मोठा समुद्रकिनारा लाभलाय ना ! त्यातला थोडा भाग संरक्षित ठेवला जाईल. तिथे मच्छिमारीला बंदी असेस. माशांच्या विविध जातींचं संगोपन तिथं होईल. शिवाय प्रशिक्षित डॉल्फिनचे खेळ सादर करण्याचीसुध्दा योजना आहे" अँथनीनं 'मरिनपार्क' बद्दलही माहिती दिली.

पहिल्याच भेटीत जयूच्या या मनमोकळया स्वभावाच्या दोस्ताशी अँथनीशी – पिंटू – प्राची सूर छान जुळले. अँथनी त्यांच्या मैफलीत सहज सामावून गेला. संध्याकाळ होऊ लागली तसे मुलांना 'पार्टी' चे वेध लागले.

αααααααααα

## ५ . पार्टीनंतरचा पराक्रम

अँथनीचं घर समुद्रकिना–यावरचं होतं. मुंबईच्या पिंटू – प्राचीला समुद्र अनोखळी नव्हता. पण का . . किनारा त्यांना अनोखा वाटला ! इथं माणसांची गर्दी नव्हती. होता फक्त समुद्राच्या लाटांचा आवाज, माना वेळावणा–या माडांची कुजबुज आणि मधूनच मालवणी बोलीतला एखादा कोळीणीचा अनुनासिक स्वर.

पंढ–या शुभ्र पुळणीतून चालताना ते वातावरण प्रणेश – प्राचीच्या अंगावर रोमांच उभे करत होते. मावळता सूर्य समोरच्या सिंधूदुर्गाचा निरोप घेत होता. "सिंधुदुर्गाच्या बाजूला खडकांची रांग दिसतेयना... तो पदमगड !" जयू म्हणाला.

"अँथनीच्या घराकडून एकदा चालत पदमगडावर गेलोय आम्ही !"

"म्हणजे पाणी खोल नाही का फारसं ?" प्राचीनं विचारलं. "तसं नव्हे, सुकतीच्यावेळी मधल्या भागातलं पाणी ओसरतं. 'भाट पडणं' म्हणतात त्याला. थोडयाच वेळापुरतं टिकतं हे आश्चर्य ! चालत जाण्यासारखा कोरडा किनारा तयार होतो. पण एकदा भरतीचं पाणी भरू लागलं की चालत येणं शक्य नसतं." जयूने खुलासा केला.

बोलता बोलता वाट संपली. अँथनीचं घर जवळ आलं. पार्टी घराशेजारच्या माडबनात होती. रंगीबेरंगी क्रेप्सच्या माळांनी एक कोपरा सजवला होता. बाजूच्या एका झाडावर इलेक्ट्रिक तोरणाच्या माळा सोडल्या होत्या. शेजारी मूर्तीकामातून ख्रिस्तजन्माचा देखावा रचला होता.

अँथनी घरात काही कामात गुंतला होता. जयू आणि कपंनी आल्याचं समजताच तो त्यांच्या स्वागताला बाहेत आला. अजून फारशी गर्दी जमली नव्हती. मोठयांची पार्टी रात्रभर चालणार असली तरी मुलांची पार्टी मात्र अकरा वाजताच संपणार होती.

"काय सरळसोट उंच झाडं आहेत ही !" माडपोफळीच्या झाडांकडे पाहात पिंटू म्हणाला.

"या माडाच्या झाडाचीच एक गंमत दाखवीन तुम्हाला ! आता नाही, उद्या किल्ल्यावर गेलो की!" जयू म्हणाला.

सात वाजले तसा अँथनीच्या मित्रमैत्रिणींनी परिसर गजबजून टाकला. पिंटू – प्राची देखील त्या बोलक्या मित्रमंडळींत सामावून गेले. सर्वप्रथम अँथनी आणि त्याच्या ख्रिश्चन मित्रांनी काही कोकणी गीतं म्हटली. त्यात येशू ख्रिस्त आणि मदर मेरीची स्तुती होती. जयेश – प्राची आणि पिंटूला त्याचा अर्थ फारसा कळला नाही, तरी ती चाल आणि म्हणण्याची पध्दत यामुळं त्यांना ती मोहक वाटली. नाताळच्या आनंदाप्रीत्यर्थ काहींनी पारंपारिक नाच केला. नंतर मुलांच्या गाण्यांच्या भेंडया सुरू झाल्या.

नाताळनिमित्त रंगीबेरंगी फुगे आकाशात सोडण्यात आले आणि दमलेली मंडळी मग खाद्य पदार्थावर तुटून पडली. हळूहळू मोठयांची वर्दळ वाढू लागली. मुलांची पार्टी संपायला तासाभराचा अवकाश होता. पण मोठयांच्या गडबडीत त्यांच्याकडे लक्ष द्यायला कुणाला वेळ नव्हता. तसे सारे आजूबाजूला पांगले.

जयू, अँथनी आणि त्याच्या खास वर्गमित्रांच्या गप्पांचा अडा जमला. प्राचीची देखील एकदोघींबरोबर मैत्री झाली होती. त्यांचा घोळका एकीकडे बसला. पिंटूला या गप्पात रस नव्हता. तो आपला एकटाच फिरत फिरत समुद्राचं संगीत ऐकायला निघाला.

आपल्याच नादात चालत चालत तो माडबनाच्या दुस–या टोकापर्यंत पोचला. त्याने मागे वळून पाहिलं. पार्टीच्या जागी एकाच ठिकाणी गोठलेला प्रकाश त्याला आता मजेशीर वाटत होता. मोठयांच्या बडबडीने आणि मधूनच उडणा–या हास्याच्या फवा–यांचे आवाज हलेकच कानावर आदळत होते. चालता चालता त्याच्या पायाला पाणी लागले तसा तो भानावर आला.

'भरती चालू झालेली दिसते' तो स्वतःशीच पुटपुटला, समुद्रावरच्या त्या मोकळया हवेत त्याने एक दिर्घ श्वास घेतला. खुशीत स्वारीच्या तोंडून शीळ निघणार तोच त्याने उजवीकडच्या झाडीत खुसफुस ऐकली.

"पडाव कोटापाशी उभा करा !" त्याच्या कानी शब्द आले. त्याने कान टवकारले.

"उस्मान, तुला तिथं भेटेल. पोलिस आणि कस्टम अधिकारी आधीच मागावर आहेत. सावधगिरी बाळगायला हवी !"

पिंटू झटदिशी माडाआड लपला आणि डोळे फाडून अंधारात पाहू लागला.

इतक्यात त्यांच्यापैकी एकान लयटर पेटवला. ते दोघेच जण असल्याचं पिंटूला त्या क्षणभराच्या प्रकाशात कळलं. दोघांनी सिगारेटी शिलगवल्या. 'टप' कन आवाज झाला. 'सिगारेटचं पाकीट फेकल गेलं असावं' पिंटूच्या मनानं नोंद केली.

त्यांचा आवाज आता स्पष्ट ऐकू येत नव्हता. हळू आवाजात ते बोलत असावेत. 'कोट', 'पडाव', सिग्नल होईल असे तुटके शब्द त्याच्या कानी आले. समुद्राच्या लाटांत आवाज विरून जात होता. दोन्ही बाजूला झाडी होती. त्यामुळं मधली मोकळी जागा खलबत करायला चांगलीच होती त्यांच्यासाठी. सगळे पार्टीत रंगल्यामुळे माडबनाच्या या आंधा–या टोकापर्यंत कुणी येऊन पोचणार नाही असा त्यांचा अंदाज असावा.

'स्मगलिंगचा धंदा असणार यांचा' पिंटूच्या सारं लक्षात येऊ लागलं. पार्टीमधल्या मोठयांपयंत खबर पोचवावी असं पिंटूला वाटलं. पण या गुंडांच्या दृष्टीस पडलो तर त्यापूर्वीच त्याच्या तावडीत सापडू ! पिंटूच्या ध्यानात आलं तसा तो विचार त्याने झटकून टाकला.

"रूमवर जातोय मी."

"मालाची काळजी घे !"

पिंटूच्या कानावर आवाज आले.

त्यातला एकजण समोरच्या झाडीकडे निघाला. झाडीपलीकडे दगडी बंधारा होता. अन त्या पलीकडे रस्ता. जयूला माहीत असणार तो रस्ता कुठं जातो ते. त्याला गाठलं पाहिजे. पिंटूच्या मनात विचार डोकावला.

पिंटूनं दुसरा माणूस पाहण्यासाठी मान फिरवली. पण नाही, तो अचानक गायब झाला होता. 'निदान हा समोर चाललाय त्याचा तरी पाठलाग करावा का ?' पिंटूचा विचार पक्का होत नव्हता.

एवढयात समोरच्या झाडीतून बाहेर पटलेल्या एका मुलानं या गुंडाच्या कमरेला विळखा घतल्याचं त्यानं पाहिलं. क्षणभरच तो गुंड गांगरला. पण आपल्याला पकडू पाहणारा लहान मुलगा आहे हे पाहताच सावरला. एका हिसडयासरशी त्यानं आपली सुटका करून घेतली. दोन झेपातच मधला दगडी बंधारा पार करून तो रस्त्यापर्यंत पोचला अन पाहता पाहता दिसेनासा झाला. त्यापूर्वी वाटेत आडव्या येणा–या आणखी एका मुलाला त्यानं लोळवलं.

"कोण वरं हे बालवीर ?" पिंटू उत्सुकतेनं पुढे सरला.

छान ! हे तर जयू, अँथनी !' तो पुटपुटला. तसे दोघे दचकले. तशी दोघांना काही दुखापत झाली नव्हती. पण अँथनीचा उतावळपणा नडला.

"तुलाच शोधायला निघालो होतो आम्ही ! अँथनीनं घाई केली, नाही तर तो कोण होता ते कळलं असतं आपल्याला." जयू म्हणाला.

"नशीब तुमचं ! इथं पुष्कळ मुलं असावीत असं वाटलं त्याला, नाही तर पळून जाण्याऐवजी त्यानं तुम्हालाच पकडलं असतं." एव्हाना प्राची तिथपर्यंत पोचली होती.

"निसटलाच तो आता. पुन्हा दिसला तर ओळखताही नाही येणार आपल्याला." जयू पुटपुटला.

"त्याच्या अंगात चौकटीचा शर्ट होता. अंधारात रंग नीट कळू शकला मला. पण लायटरच्या उजेडात हिरवा असा वाटला !" केवळ अँथनीलाच त्याला जवळून पाहाण्याची संधी लाभली होती.

पिंटूचे डोळे लकाकले. शोधक नजरेने तो काहीतरी धुंडाळू लागला, आजूबाजूला.

"हॅट ! त्याला फारसा उपयोग होईलसं वाटत नाही मला ! माझासुध्दा हिरव्या चौकडीचा शर्ट आहे एक !" जयू म्हणाला.

"इथं अशा गप्पा मारण्यापेक्षा त्याला शोधून काढण्यासाठी हातपाय हलविले पाहिजेत." प्रची म्हणाली.

अखेर पिंटूला हव होतं ते गवसलं. "मी त्या माणसाला ओळखतो" हातातली वस्तू नाचवत तो आनंदाने किंचाळला.

काय, वेड लागलंय का याला म्हणून सारे आश्चर्याने पाहू लागले.

पिंटूच्या हातात सिगारेटचं एक रिकामं पाकीट होतं.

αααααααααα

## ६ .सावज गवसले... सावज निसटले

अँथनीच्या मनगटावरच्या घडयाळात साडेदहाचा आलार्म वाजला, तसे सारे भानावर आले. पिंटूने मग त्यांना बसमधला किस्सा सांगितला.

"नानाकाका ज्याच्या शोधात आहेत, तो हाच स्मगलर तर नाही ना ?" प्राचीने प्रश्न उपस्थित केला.

"कदाचित तो दुसराही असायचा". पिंटू म्हणाला.

"हो, त्या दुस-या माणसाचा विचार आपण केलेलाच नाही." अँथनी म्हणाला.

"तुमच्या झटापटीनंतर तो मलाही दिसला नाही, पण त्यानंतर लगेच लॉच सुरू झाल्याचा आवाज आला." पिंटूने माहिती पुरवली.

"मी ऐकलं. त्यांच्यातला एक जण मी रूमवर जातो म्हणाला. जर ती दुसरी व्यक्ती लॉचने गेली असेल तर आपण ज्याच्याशी झटापट केली, तो आपल्या रूमवर पळाला असेल !" जयू म्हणाला.

"तसं असेल तर हा हिरवा चौकडीवाला एव्हाना कल्पतरू लॅजवर पोचला असणार ! पिंटू.

"काय ?" तिघांनाही पुन्हा आश्चर्याचा धक्का बसला.

"हो, मघाशी मी तुम्हाला सांगायला विसरलोच. त्यालाच शेजारच्या कंपाउंडमध्ये पाहून नाही का मी तुला विचारलं, कोण हा शेजारी म्हणून ?" पिंटूने जयूला आठवण करून दिली.

"आता इथे गप्पा मारत वेळ घालवू नका. नानांना तत्काळ कळवायला हवं." प्राची म्हणाली.

"हो, पहिल्यांदा आपण हेच काम करू. मला ठाऊक आहे, बाबांचं ऑफिस." जयू म्हणाला.

“पण तोपर्यंत कुणाशी काही बोलू नका याबद्दल.” प्राचीने सल्ला दिला.

सारे माघारी फिरले. मोठयांची पार्टी आता रंगात आली होती. मुलांची पार्टी संपली होती. निघताना अँथनीने सा–यांना पटापट कटवलं. मग ‘जयूला पोचवून यतो’ म्हणून घरी सांगून प्रणेश – प्राची व जयूसह तो कस्टम ऑफिसच्या दिशेने निघाला.

अँथनीच्या घरापासून अर्ध्या – पाऊण किलोमीटरवर किना–यालगतच कस्टम ऑफिसची डौलदार इमारत होती. झटापट पावले उचलीत ते चालू लागले. त्यांच्या चेह–यावर एक प्रकारचा ताण जाणवत होता. सारे गप्प गप्पच होते.

नानाकाकांचा असिस्टंट नील नवाथे ही जयूला पाहताच पुढे आला. एवढया रात्रीची ही मुले इथे कशी ?’ म्हणून त्याला आश्चर्य वाटले.

“साहेब निघताहेतच आता.” तो म्हणाला.

केबिन बंद करून बाहेर पडणारे नाना धापा टाकत जिना चढणा–या मुलांकडे अचंब्याने पहातच राहीले. त्यांनी तोंड उघडण्यापूर्वी जयूने घडाघडा सारी गोष्ट सांगायला सुरूवात केली. मधल्या रिकाम्या जागा भरून काढण्याचे काम पिंटू आणि अँथनी करत होते. सारा प्रकार नानांच्या लक्षात आला.

एव्हाना साडेअकरा वाजले होते.

अँथनीच्या सोबतीला एकाला देऊन त्यांनी त्याला घरी पोचविले.

“त्या लॉचवाल्यानं आतापर्यंत एखादी सुरक्षित जागा गाठली असेल. त्यामुळे त्याला पकडता येणं कठिण आहे, पण वेळ न घालवता आपल्याला हिरव्या चौकडीवाल्याच्या मागे लागायला हवं.” मागे वळून नानांनी अजितला सूचना दिल्या आणि काही महत्त्वाचे फोन करण्यासाठी ते ऑफिसमध्ये गेले.

थोडयाच वेळात निवडक माणसांसह पिंटू, प्राची व जयूला घेऊन नानांची जीप घराच्या दिशेने भरारत निघाली.

नानांनी लॉजला टाळून जीप सरळ घरासमोर उभी केली. जयू – प्राचीची त्यांनी घरात रवानगी केली. त्यांच्या मदतनिसांनी कल्पतरूला वेढा घातला. नाना आणि पिंटू लॉजच्या दिशेने निघाले.

गेटपाशी एक मोटरसायकल उभी होती. काऊंटरवरचा रिसेप्शनिस्ट अर्धवट झोपेत होता.

नानांनी त्याला जागा केलं. त्याला आश्चर्य वाटलं ! नानांना तो ओळखत होताचं पण त्यांच्याबरोबरच्या शस्त्रसज्ज मदतनीसाला पाहाताच मामला गंभीर असल्याचं त्याच्या लक्षात आलं.

नानांनी रजिस्टरकडे नजर टाकली. तिथं एकाच नावाची नोंद होती.

'शंभा शहाणे' रूम नं १७.

"खोटे नाव असणार हे !" ते स्वतःशीच पुटपुटले. "खोलीवर असेल ना तो ?" त्यांनी विचारले.

"हो आत्ताच वीस मिनिटांपूर्वी आलाय की तो मोटरसायकलवरून". घडयाळाकडे पहात रिसेप्शनिस्ट उद्‌गारला. पण रूम दाखविण्यासाठी तो वळला अन चक्रावलाच ! बोर्डावर सतरा नंबरची चावी लटकत होती.

"कमाल आहे ! वीस मिनिटांपूर्वीच तर मी चावी दिली की त्याच्याकडे. नंतर मला झोप लागली. आणखी दोन दिवसांचं आगाऊ भाडं भरलेलं आहे त्याचं. पण असा अचानक कसा निघून गेला हा प्राणी !" रिसेप्शनिस्ट अचंब्यात पडला.

"हं ! पक्षी निसटला बहुदा सापळयातून !" नानाकाकांनी सुस्कारा टाकला.

रूम नं १७ ची तत्काळ झडती घेण्यात आली. पण ती निष्फळ ठरली.

"मोटरसायकलवरून तो आल्याचं पाहून अंमळ आश्चर्यच वाटलं मला." रिसेप्शनिस्ट माहिती पुरवू लागला. एव्हाना पोलिस – पथकही येऊन पोचले होते.

"त्यात काही विशेष नाही. पळ काढताना त्याला मोटरसायकल दिसली असणार. ती देखील लॉक न केलेली. ते चांगलंच फावलं त्याला. तत्काळ तो इथं आला अन् चंबूगबाळं आवरलं त्यानं !" पोलिस पथकाचं नेतृत्त्व करणा–या इस्पेक्टर वाघांनी सांद्यत हकीकत ऐकल्यानंतर निष्कर्ष काढला.

या धाडीतून अखेर तसं काहीच निराश होऊन परतले. नानाकाकांनी देखील आपल्या मदतनीसांना सूचना दिल्या. अन् आपल्या असिस्टंटसह ते पिंटूला घेऊन घरी आले.

घरी सारे जागेच होते. मग पिंटूदेखील विक्रमवीराच्या आवेशात भाव खाऊ लागला. नानांचे मात्र इकडे लक्ष नव्हते. रिसेप्शनिस्टने सहज म्हटलेल्या एका वाक्याबद्दल ते विचार करत होते. 'आल्यापासून त्याच्या अंगावर हिरव्या चौकडीचा शर्ट होता.' रिसेप्शनिस्टने अनाहूतपणे पुरवलेल्या या माहितीबद्दल राहून राहून विचार करत होते.

हलकेच नानांच्या तोंडून शीळ निघाली. तसे पिंटू – प्राचीने चमकून पाहिले. 'नानाकाका शीळ घालतात' त्यांना शोधच लागला होता.

नानांनी पिंटूला तो शर्टचा तुकडा आणण्यास फर्मावले. असिस्टंटशी हलक्या आवाजात तो चर्चा करत होते. पिंटूने आणून दिलेला तुकडा पहाताच त्यांच्या मुद्रेवर स्मित झळकले. साध्या हिरव्या रंगाची चौकडी असलेला कापडाचा तो त्रिकोणी तुकडा, पण आतल्या बाजूने अस्तर असल्याची शिवण त्याच्यावर दिसत होती. नानाकाकांचा कयास खरा ठरला होता. त्यांच्या असिस्टंटचा चेहेरा देखील आता पूर्वीइतका निराश नव्हता.

काहीतरी सूत्र मिळालं म्हणायचं..... दोघांची चर्चा चालू होती.

घडयाळाने दोनचे टोले दिले तेव्हा सारे भानावर आले. मग पेंगुळलेल्या डोळयांनी बच्चेकंपनी अंथरूणाकडे वळली.

αααααααααα

## ७ . सिंधुदुर्गावर स्वारी

रात्रीच्या जागरणामुळे मग मुलांची सकाळ दुस-या दिवशी उशिराच उजाडली . पण दिवस बदलला तरी मुलांच्या बडबडीचा विषय मात्र बदलला नव्हता . शेरलॉक होम्सच्या थाटात जयू आणि प्राचीचीही तर्क बांधण्याची स्पर्धा चालू होती . अँथनीच्या आगमनानंतर तर गप्पांना खरा रंग चढला . अखेर काकूंनी, "अरे, आज तुम्ही सिंधुदुर्ग पाहाण्यासाठी जाणार होता ना ?" अशी त्यांना त्यांच्या बेताची आठवण करून दिली, तेव्हा सारे भानावर आले .

पाहुण्यांना किल्ला फिरवून आणण्याची कामगिरी अँथनीने उत्साहाने आपल्या अंगावर घेतली होती . जेवण होताच सारे अँथनीकडे निघाले . अँथनीच्या वडिलांनी त्यांच्या फिशिंग एजन्सीमधे काम करणा-या एका नोकराकडे – सुकडयाकडे – मूलांना सांभाळून नेण्या – आणण्याची जबाबदारी सोपवली होती .

सुडक्या साठीचा . शिडशिडीत अंगाचा . पण होडी वल्हवण्यातलं त्याचं कसब वाखाणण्यासारखं होतं . टापूतला जाणकार दर्यावर्दी होता तो .

"पावणे खंयचे ? मुंबईचे ?" मुलांना पहाताच सुकडयानं विचारलं .

क्षणभर प्राची – पिंटूला काही कळलंच नाही .

पण त्या अनुनासिक हेलामुळे पिंटूला हसू मात्र फुटलं .

जयू म्हणाला, "अरे मालवणी बोलीमधे बोलतात ना इथली लोकं . . . . 'पाहुणे कुठचे ? मुंबईचे का?' असं विचारलं त्यानं .

अँथनीच्या घरी शहाळयाचे गोड पाणी पिऊन बच्चेकंपनी सिंधुदुर्गावर स्वारी करायला सज्ज झाली . "ही उलांडी होडी . ह्येंच्या येका बाजूला अशे काठये बांधतात . त्येंना ह्येंचो तोल संबाळलो जाता ." नांगर उचलून वर घेताना सुकडया म्हणाला .

"तू आम्हाला किल्ल्यावर एक गंमत दाखवणार होतास... काहीतरी नारळाला झाडाशी संबंधित!" पिंटूनं जयूला आठवण करून दिली.

होडीच्या प्रवासाची मजा मुलं अनुभवत होती. साथीला सुकडयाच्या तोंडून निघणा–या कोळी – गीताच्या लेकरी वा–याशी स्पर्धा करीत होत्या.

"पण या किल्ल्यात शिरायचं कसं ? त्याचं प्रवेशव्दार कुठे आहे ?" प्राचीनं विचारलं. किल्ला दिसतोय पण प्रवेशव्दाराचं काही चिन्ह दिसत नाही हे पाहून ती अचंबित झाली होती.

"अगं! किल्ल्याचं प्रवेशव्दार एका बुरूजाआड दडलं आहे. इतकी फँटॅस्टिक रचना आहे ना प्रवेशव्दाराची की जवळ पोचेपर्यंत पत्ताच लागत नाही !" अँथनी आता सा–यांचा गाइड बनला होता. वल्हयांना रेटा देऊन सुकडयाने होडी काठाशी घेतली. नांगर टाकला आणि मुलांनी रेतीत उडया ठोकल्या.

"अबब ! किती उंच आहे ही भिंत ?" पिंटू उद्‌गारला.

"तीस फूट ! अँथनीनं तात्काळ विचारलेली माहिती पुरवली. आता तो गाईडच्या भूमिकेत पुरता एकरूप झाला होता, ". . . .आणि बारा फूट रूंदी. या तटबंदीला बेचाळीस बुरूज आहेत आणि तटाचा घेर दोन मैल."

"ह्या तटावरसून बैलगाडीसुध्दा जावक शकता." सुकडयाने पुरवणी जोडली.

"हं ! असे या दोन बुरूंजाच्या मधल्या जागेतून आता चला. आता इकडे वळलेत की दर्शन होईल मारूतीचं आणि त्याच्या समोरच्या दरवाज्यानं आत शिरलेत म्हणजे तुम्ही किल्ल्यात प्रवेश केला." वाटाडयाच्या थाटात अँथनी पुढं चालला होता.

"वा ! काय गंमत आहे नाही. . . . !! छान लपलयं प्रवेश व्दार." प्राची खूष होऊन म्हणाली.

"अरे पण इथे तर सगळी जमीनच दिसतेय की ! हा पाण्यातला किल्ला ना ?" पिंटूची शंका.

"अरे पाण्यातला किल्ला म्हणजे काही पाण्यावर तरंगणारा नव्हे . . . . ! हे एक बेट होतं समुद्रातलं, करटे बेट म्हणून. पण इथं पोचणं कठीण आहे. . . . आजूबाजूच्या पाण्यात लपलेल्या खडकामुळे फक्त माहितगार माणूसच इथपर्यंत होडी आणू शकतो." अँथनी उत्तरला.

"म्हणून तर शिवाजी महाराजांनी हया बेटाची किल्ला बांधण्यासाठी निवड केली !" जयूलाही

आता स्फुरण आलं होतं.

पिंटू आणि प्राचीची नजर नुसती भिरभिरत होती. खरं म्हणजे आपल्याला नेमक काय जाणवतय ते त्यांना सांगता येत नव्हतं.

"आता हे उजव्या हाताला जे मंदिर दिसतंय ना, ते अशा प्रकारचं संपूर्ण महाराष्ट्रातलं एकमेव मंदीत आहे !" पिंटू – प्राचीच्या प्रश्नार्थक चेहे-याकडे पहात अँथनी सांगू लागला. "हे आहे शिवाजी महाराजांचं मंदिर, पण यातली शिवरायांची मूर्ती कोळयाच्या वेषात आहे.

"या मूर्तीचा चेहेरा खूप वेगळा वाटतो ना ?" प्राची म्हणाली.

"हो, या मूर्तीला दाढी नाही, आणि डोक्यावर नावाडयाची टोपी आहे". जयू म्हणाला.

"शेजारी जी तलवार ठेवलेली आहे, ती राजाराम महाराजांची तलवार. त्यांच्याच कारकीर्दी त हे मंदीर उभारलं गेलं असं म्हणतात." अँथनी म्हणाला.

मंदीरातून सारे बाहेर पडले, तसे जयू पिंटूला म्हणाला, "काल तुला म्हटलं होतं ना मी, एक नारळाच्या झाडाची गंमत किल्ल्यावर गेलो की दाखवीन म्हणून, ते हे समोरचं झाड. त्या माडाला चक्क फांदी फुटलीय आणि त्या दुस-या फांदीला सुध्दा नारळ धरलेयत."

"ओ, हो ! गंमतच आहे !" पिंटू – प्राची एकदमच म्हणाले.

"मालवण परिसरातले हे एकमेव नारळाचं झाड, असा चमत्कार दाखवणारं ! किल्ला पाहायला येणारी लोकं जितक्या उत्सुकतेने इथली विविध स्थानं पाहातात, तितक्याच नवलाईनं हे झाड पाहायला थांबतात." अँथनी म्हणाला.

किल्ल्यावरच्या फेरफटक्यात मुलांना नवलाईच्या अशा अनेक चिजा दिसल्या, खा-या पाण्याच्या सागरानं वेढलेल्या किल्ल्यात ... गोडया पाण्याच्या विहिरीचं पाणी चाखून मुलं चकित झाली ! भटकंतीत त्यांनी इतर देवालयं आणि जुन्या वाडयाचे अवशेष पाहिले. तटावर चढून शिवरायाच्या हातापायांचे ठसे राखलेल्या घुमटया पाहिल्या.

"पण या किल्ल्यात भुयार वगैरे नाहीत का ?" प्राचीनं विचारलं.

"भूयारं पूर्वी असतीलही कदाचीत, पण नंतर बहुदा ती बूजवून टाकण्यात आली." अँथनी म्हणाला.

"पण एक चोरवाट मात्र आसा, राणीची वेस !" सुकडयाने सांगितलं.

"राणीची वेस म्हणजे राणीचा किनारा." जयूने खुलासा केला.

“किल्ल्याच्या तटाला एक छोटासा चोर दरवाजा आहे. त्या वाटेने किल्ल्याबाहेर जाता येतं. सुकतीच्या वेळी पाणी ओसरल्यानं इथं छोटासा किनारा तयार होतो.” अँथनी माहिती सांगू लागला.

बोलत बोलत मुलं त्या स्थळी येऊन पोचलीसुध्दा. उन्हं आता पार उतरली होती. चोर दरवाजा दिसताच पिंटू – प्राचीने धावतच एका उडीत तो पार केला. क्षितिजापर पसरलेल्या सागराचं दर्शन विलोभनीय होतं. हलकेच तटापाशी येऊन धडकणा–या लाटांशी बच्चेकंपनीचा खेळ चालला होता.

“समुद्रस्नानासाठी राण्या चोर दरवाज्यांचा वापर करून या किना–यावर येत. म्हणून याला ‘राणीची वेस’ म्हणतात.” अँथनीमधला गाइड चांगलाच जागरूक होता.

किना–यावर शंख – शिंपल्यांच्या गर्दीत पिंटुला एक काटेरी चीज दिसली. त्याचा वापर लिहीण्यासाठी करतात हे सुकडयाकडून समजताच दोन – चार काटे त्याने पॅंटच्या खिश्यात सरकवले. किल्ल्याच्या भ्रमंतीतला हा शेवटचा टप्पा होता. अन एव्हाना जमा केलेल्या शंख – शिपल्यांनी पिंटूच्या पॅंटचे खिसे तट्ट फुगले होते.

मावळत्या दिनकराचं दर्शन घेण्यासाठी मंडळी तटावर रेंगाळली. मावळतीला घरटयाकडे परतणा–या पाखरांच्या थव्यांनी आसमंत भरून टाकला होता. क्षितिजाआड समुद्रात हळूहळू विरत चाललेल्या सूर्याकडे पाहताना मुलांची तंद्री लागली होती.

सूर्यास्त झाला तसा दूर क्षितिजावर एक प्रकाशबिंदू चमकला, तिकडे सा–यांचं लक्ष वेधत अँथनी म्हणाला , “तो निवतीचा दीपगृह ! इतक्या दूर अंतरावरून आपल्याला त्या प्रकाशाची उघडमीट दिसते!”

“तो पाहा दिसला का ?” निवतीच्या दिशेने बोट राखून, जयू प्राचीला दाखवू लागला.

“हो , हो. तो पाहा प्राचीताई उघडमीट करणारा दिवा.” पिंटू म्हणाला. तेव्हा प्राचीचं लक्ष त्याच्याकडे गेलं आणि सारेच हसू लागले.

“अहो पिंटोबा, तुम्ही ज्या दिशेकडे पाहताय तो मालवणच्याच किना–याचा भाग आहे. राजकोट आणि दीपगृह तुम्ही बघताय, त्याच्या चक्क विरूध्द दिशेला दूर समुद्रामधे निवती इथं आहे.” जयू हसतच म्हणाला.

“दिपगृहाकडे चक्क पाठ फिरवून उभं राहिल्यावर तुला तो उघडमीट करणारा दिवा

दिसला, म्हणजे तुझ्या पाठीला डोळा फुटलेला दिसतोय !" प्राचीही त्याला चिडवू लागली.

मग फुरंगटलेल्या पिंटूला जयू – अँथनीने दीपगृहाचा लख्ख चमकणारा दिवा दाखवला. एव्हाना अंधार दाटू लागल्यानं सुकडयानं मुलांना परत फिरवण्यासाठी घाई सुरू केली. मग थोडंफार रेंगाळतच मुलांना परतीचा प्रवास सुरू झाला. त्यांच्या गप्पांना तसा विषय नव्हता, पण "तुमच्या त्या राजकोटात मला उघडमीट होणारा दिवा खंरच दिसला होता," असं पिंटू जेव्हा पुटपुटला, तेव्हा पुन्हा एकवार सा–यांना हसू फुटलं.

"सिंधुदुर्गाच्या रक्षणासाठी शिवाजी महाराजांनी किना–यावर जे छोटे किल्ले बांधले, त्यापैकी राजकोट एक. पण आता तिथे किल्ला म्हणण्यासारखं फारसं काही उरलं नाही. नुसता खडकाळ भाग आहे." अँथनीनं राजकोटचा विषय निघताच माहिती दिली.

"आणि तिथे म्हणे प्रणेशसाहेबांना दीपगृह असल्याचा साक्षात्कार झाला !" प्राचीनं संधी दडवली नाही.

हास्यकल्लोळात पिंटूचं पुटपुटणं पार बुडून गेलं पण त्या दिवशी अंथरूणावर पडून डोळे मिटेपर्यंत राजकोटात उघडमीट करणारा दिवा पिंटूच्या मनातून गेला नव्हता.

αααααααααα

## ८. रेकोबाचा घाटी ? ....की राजकोट ?

मालवण मुक्कामातील तीन दिवस उलटून गेले. प्राची विचार करत होती. तीन दिवसात किती विलक्षण घटना घडल्या ! या सफरीतील थ्रिल तिला जाणवू लागलं होतं. 'काल आपण पिंटूची थट्टा उडवली खरी, पण खरंच त्याला राजकोटात दिव्यांची उघडमीट दिसली असावी का ? आणि समजा त्याला दिसलेली गोष्ट भास नसून खरी असेल तर कुण्या स्मगलर्सच्या गुप्त संदेशांची ती देवाण – घेवाण तर नसावी ?...... छे ! आपण उगीचच संशयी बनतोय बहुदा !' तिनं स्वतःच्या मनाची समजूत घातली.

चौथ्या दिवसाची सकाळ उजाडली, तेव्हा प्राचीच्या मनातले विचार हे असे होते आणि पिंटूचं काय विचाराल ! त्याला तर अलिबाबाच्या गुहेत शिरावं तसं वाटत होतं.

"हिरवी चौकडीवाला, हूं !" पिंटूनं नाक उडवलं.

'मालवणात पाऊल टाकतानाच याच माणसाचा शर्ट त्याच्याकडनं फाटला गेला होता. याच्याचमुळे पिंटूच्या संग्रहात ५५५ च्या पाकिटाची भर पडली होती. बरं प्रकरण एवढयावरच थांबलं नव्हतं.' पिंटूचं विचारचक्र चालू होतं....'अँथनीकडे नाताळच्या पार्टीला म्हणून आपण जातो काय..! अन तिथं हाच हिरवी चौकडीवाला स्मगलिंगच्या गँगमधे असल्याचा शोध आपण लावतो काय ! सारंच अजब! ...पण तितकंच खरं !... नानाकाकांना आपण तपासात केवढी मदत केली, पण या प्राचीला काही आहे का त्याचं ? काल त्या राजकोटात मला दिवा पेटताना दिसला म्हणून मी सांगितलं तर केवढी थट्टा उडवली माझी ! अगदी काकूसुध्दा हसल्या. प्राचीनंच त्यांना सगळं तिखट – मीठ लावून सांगितल्यावर त्या हसणारच म्हणा ! छे ! अगदी दुष्ट आहे ही प्राचीटली ! नानाकाका घरी नाहीत म्हणून... नाहीतर..."

पिंटू पार फुरंगटून बसला होता. सा-यांनी प्रयत्न केले. पण त्याचा रूसवा घालवण्यात

अखेर रूबीच यशस्वी ठरला. या मुक्कामात पिंटू आणि रूबीची छान गट्टी जमली होती.

पोटपूजा पार पडताच बच्चेकंपनीनं पुन्हा फिरायला जाण्याचा बूट काढला. "तुम्ही दीपमाळ पाहिली नसेलच !" जयेश म्हणाला. तेव्हा पिंटू हा काय प्रकार आहे. अशा विचारात पडला.

"दीपमाळेचं चित्र मी पाहिलयं, पण दीपमाळ प्रत्यक्ष कधी पाहिली नाही." प्राची म्हणाली.

"तर मग तुम्हाला रेकोबाच्या घाटीला भेट दिलीच पाहीजे." दरवाज्यातून आत येता येता अँथनी म्हणाला. प्राचीचे शेवटचे शब्द त्याच्या कानी पडले होते.

अँथनीच्या आगमनानं प्रणेश, प्राची व जयूला जितका आनंद झाला, तितकंच आश्चर्यही वाटलं. "त्याचं असं झालं" अँथनी सांगू लागला, "सकाळी मी नानाकाकांच्या ऑफिसमधे गेलो होतो, ते संध्याकाळी आपण फिरायला जाण्याचा बेत करू हा निरोप त्यांच्याकडे देण्यासाठी. पण काका फार गडबडीत होते. तपासाच्या कामामुळे कदाचित आज घरीही येता येणार नाही असा निरोप देण्यासाठी त्यांनीच मला इकडे पिटाळल. आणखी पाहुण्यांना सगळया पिकनिक स्पॉटवरून फिरवून आणण्याची कामहिरीदेखील माझ्यावर सोपवली." तो रूबाबात म्हणाला.

"छे ! त्या हिरव्या चौकडीवाल्याने या ट्रिपची पुरती वाट लावून टाकली. नाहीतर नानाकाकांबरोबर किती धमाल करता आली असती!" प्राची म्हणाली.

"हो, पण त्यानं तुमच्या सफरीत थ्रिल ओतलं नाही का?" काकू म्हणाल्या. "शिवाय पिंटूची देखील या प्रकरणाच्या तपासात अनपेक्षितपणे मदत झाली !" फुरंगटलेल्या पिंटूला खूष करण्याची एकही संधी सोडायची नाही असं सा–यांनी ठरवलं होतं.

"पण दीपमाळ म्हणजे काय ?.... आणि त्यासाठी रेकोबाच्या घाटीवर का गेलं पाहिजे?" सा–यांचं लक्ष आपल्याकडे आहे हे पहाताच पिंटू जागा झालां.

"ते तुला तिथे गेल्यावरच कळेल." जयेश म्हणाला.

"मला आणि रूबीलाही !!" आपल्याबरोबर रूबीसुध्दा तिकडे येतो आहे." पिंटूने सा–यांच्या प्रश्नांकित चेह–याकडे पहात खुलासा केला. अन रूबीनेदेखील शेपटीचा शेंडा हलवत त्याला दुजोरा दिला. त्या दिवशी मग रूबीदेखील ऐटीत प्रणेशच्या खांद्यावर बसून फिरायला बाहेर पडला.

"घाटी म्हणजे लहानसा डोंगर, ज्याच्या माथ्यावर पायवाटेने चढून जाता येतं." जयेश प्राची – पिंटूला माहिती देऊ लागला, "असं म्हणतात की, रेकोबा या देवानं इथं लढाई करून राक्षसांना मारलं, म्हणून या भागाला 'रेकोबाची घाटी' हे नाव पडलं."

घाटी चढून जाताना बच्चेकंपनीची पार दमछाक झाली. पण घाटी चढल्यावर दिसणारं दृष्य नक्कीच श्रमपरिहार करणारं होतं. क्षितिजापार पसरलेला सागर आणि त्या पार्श्वभूमीवर उठून दिसणा-या काळयाकभिन्न फत्तराला दीपमाळा. गवताचं पातंही नसलेला उघडाबोडका माळ.

“पण दीपमाळ नेहेमी देवळाच्या परिसरात असते ना ? इथं जवळपास कुठंच देऊळ दिसत नाही!” प्राचीनं शंका प्रकट केली.

ह्या दीपमाळा शिवकालीन आहेत. त्या निव्वळ संदेशाची देवाणघेवाण करण्याकरता बांधल्या गेल्या असाव्यात असं बाबा म्हणत होते. कारण अगदी किल्ल्यावरूनही इथली दीपमाळा प्रकाशित केली म्हणजे समजू शकते !” जयेश म्हणाला.

“पण लोक मात्र आजही इथे दिवे लावत असावेत. सगळं तेल सांडलेलं दिसतयं ! दीपमाळेवर हात फिरवत प्राची म्हणाला.

“छे ! इथं कोण कशाला येईल ! आणि ते सुध्दा दीपमाळ पेटवायला ? गेली कित्येक वर्ष इथं कुणी दिवा लावला नसेल !” अँथनी म्हणाला.

“पण हा भाग तेलकट आहे खास!” जयूनं जागा बारकाईनं निरखली.

“स्मगलर्स !! ते नक्कीच याचा वापर देवाणघेवाणीसाठी करत असतील!” प्राचीनं नवीनच पिल्लू सोडलं.

“बापरे प्राची ! अगं, पूर्वी शत्रूच्या घोडयांना संताजी – धनाजी पाण्यात दिसायचे, तसे स्मगलर्स तुला जागोजागी दिसू लागलेयत की काय ? अँथनी खो खो हसू लागला.

“अग, एखाद्या गावका-यानं रेकोबा देवाला नवस करून दिवा लावला असेल. तुमचं काय मत आहे बाल – डिटेक्टिव्ह ?” त्यानं पिंटूला विचारलं.

एवढा वेळ पिंटू शांत होता. बराचसा काळ त्यानं दिपमाळ म्हणजे काय ते अनुभवण्यात घालवला होता आणि नंतर स्वारी रूबीशी खेळण्यात दंग झाली होती.

“मला वाटतं आपण राजकोटात जाव.” पिंटू म्हणाला. तो सारे हसू लागले.

“अरे पण तिथे पाहण्यासारखं काहीच नाही. नुसता खडकाळ भाग !” जयू म्हणाला.

“हो, पण लाटा खडकांवर आपटू लागल्या म्हणजे काय धमाल येते ! शिवाय अजून घरी परतायला बराच अवकाश आहे. इतका वेळ आपण इथं काय करणार ? त्यापेक्षा फेरफटका मारलेला बरा.” अँथनीनं सुचवलं.

घाटी उतरायला मग मुलांना फारसा वेळ लागला नाही. पिंटू, अँथनी आणि रूबी, आघाडीवर होते. गप्पांच्या नादात रस्ता कधी संपला तेही त्यांना कळलं नाही. खडकांच्या रांगांतून फेसाळणा–या लाटांचे तुषार उडू लागले, तसा अँथनी मागे पडलेल्या जयू – प्राचीसाठी थांबला.

खडकांवरून उडया मारण्यात रूबीला मात्र मोठी मौज वाटत होती. अन तो पाण्यात पडेल म्हणून त्याला सांभाळण्यासाठी पिंटूही त्याच्यामागे धडपडत होता. अचानक एक चमकदार वस्तू पकडण्यासाठी रूबीनं झेप घेतली, म्हणून पिंटूही निरखून पाहू लागला. ती वस्तू त्यानं तात्काळ ओळखली. त्याच्या हृदयाचे ठोके जलद पडू लागले. अँथनीला हाक मारण्यासाठी पिंटू मागे वळाला. पण एव्हाना खडकावरून उडया मारत आपण बरंच लांब आल्याचं त्याला जाणवलं. दूरवर कुणाचीच चाहूल नव्हती. रूबीच्या पकडीतून ते ५५५ चं पाकीट त्यानं काढून घेतल. अन जयेश व अँथनीला गाठण्यासाठी तो परत फिरणार, तेवढयात नजरेच्या कोप–यात त्याला पाठीमागे हालचाल झाल्याचं जाणवलं. खडकांच्या खबदाडीतून एक व्यक्ती बाहेर पडत होती.

डोळयाला गॉगल अन अंगावर हिरव्या चौकडीचा शर्ट ! पिंटूनं त्याला ओळखलं. अभावितपणे त्याच्या तोंडून अस्फुट किंकाळी बाहेर पडली. हिरव्या चौकडीवाला सावध झाला. एका झेपेत त्यानं पिंटूची मानगूट पकडली अन त्याचं तोंड बंद केलं. खेचतच त्यानं पिंटूला बरोबर घेतलं. बाजूचा दगड सरकवला अन पिंटू आतल्या पोकळीत फेकला गेला. त्या भगदाडामधून शरीत आत जाण्यापूर्वी नजर ताणून पिंटूनं पाहून घेतलं. रूबीसुध्दा जवळपास दिसत नव्हता.

αααααααααα

## ९. डिटेक्टिव्ह रूबी

"काल संध्याकाळी तुम्ही घरातून बाहेर पडल्यावर काय काय घडलं, ते मला नीट पुन्हा एकदा सांग पाहू अँथनी !" इन्स्पेक्टर वाघांनी फर्मावलं.

आदल्या दिवशी रात्री उशीरापर्यंत तपास चालू असूनही पिंटूचा शोध न लागल्यानं, त्या सकाळी नानाकाकांच्या घरचं वातावरण शोकाकुलच होतं. कस्टम आणि पोलीस पथकाचे प्रयत्न चालूच होते. त्याच संदर्भात इन्स्पेक्टर वाघ नानांच्या घरी आले होते.

"रेकोबाची घाटी उतरून आम्ही राजकोटात निघालो. पिंटू आणि मी पुढे होतो. प्राची आणि जयेश बरेच मागे पडले. राजकोटातल्या खडकांच्या रांगांची सुरूवात झाली तेव्हा मी, जयेश आणि प्राचीची वाट पहात थांबलो," अँथनी सांगत होता.

"रूबी उडया मारत पुढे चालला, त्याच्याबरोबर पिंटूही पुढे गेला. जयेश आणि प्राचीला मला गाठायला फार तर पाच एक मिनीटं लागली असतील ते आल्यावर आम्ही पुढं निघालो. इतक्यात एका खडकावर प्राचीला रूबी दिसला. पिंटू मात्र जवळपास दिसत नव्हता." अँथनीचं कथन चालू होतं.

"तो लपला असेल, आम्हाला वाटतं...... आम्ही पुष्कळ शोधलं पण......" हुंदके देत प्राची सांगू लागली. पण अचानक तिला रडू फुटलं तशी काकूंनी तिला जवळ घेतलं. अन स्वतःचे डोळे टिपत त्या तिची समजूत काढू लागल्या.

वातावरणाला ताण पेलवत नानाकाकांनी पुढचा भाग सांगितला, "तो लपला असल्याची मुलांची समजूत झाली. पण बराच वेळ शोध करून त्याचा पत्ता लागला नाही, तेव्हा मुलं माझ्या ऑफिसमधे आली. मी तात्काळ तुम्हाला कळवलं आणि शिवाय माझ्या माणसांसह तपासही चालू केला. त्याला तसं बऱ्यापैकी पोहता येतं. त्यामुळे तो समुद्रात वाहून जाण्याची शक्यता कमी.

. . .तरीही आमच्या गस्ती नौकांव्दारे शोध चालूच आहे. पण माझ्या कल्पनेप्रमाणे गेल्या चार – पाच दिवसातल्या घटना पाहता त्याला ओलीस ठेवण्यात आल असावं." नानांनी आपला तर्क व्यक्त केला.

"कुख्यात स्मगलर पेद्रु परेरा स्मगलिंगच्या मालाच्या देवघेवीसाठी स्वतः किना–यावर येणार असल्याची खबर आम्हालाही मिळाली आहे. त्या पार्श्वभूमीवर मलाही तर्क अचूक वाटतो !" इन्स्पेक्टर वाघांनी नानांच्या म्हणण्याला दुजोता दिला.

"तसं असेल तर एखादं धमकीचं पत्रही तुम्हाला आज मिळेल. खरं म्हणजे 'कल्पतरू लॉज' मधून पळून गेलेला परेराचा साथीदार जर का आपल्याला सापडला. तर त्यांचा गूप्त अड्डा लगेच कळून येईल आणि सारीच चिंता मिटेल. आमचे जोरदार प्रयत्न चालू आहेतच." नानांना दिलासा देऊन इन्स्पेक्टर वाघ गेले. बराच काळ नाना विचार करत बसले होते. सा–यांच्याच चेहे–यावर चिंतेची काळोखी पसरली होती.

"चला !" एकदम ते उठले आणि मुलांना म्हणाले, "आपण राजकोटात फेरी मारू. तिथंच या प्रकरणाचे धागेदोरे हाती लागतील. रूबीलाही बरोबर घ्या !"

आपल्या मदतनिसांना आपल्या मागोमाग पण . . .ठराविक अंतर राखून येण्यास त्यांनी फर्माविले. इशारा केल्यावरच पुढे येण्याबद्दल त्यांना त्यांनी सूचना दिल्या.

मंडळी राजकोटजवळ पोहोचली. तेव्हा सकाळचे अकरा वाजले होते. समुद्र कालच्या इतकाच आजही शांत होता.

"नेमक्या याच जागी मी थांबलो अन रूबी अन पिंटू पुढे गेले." अँथनीनं नानाकाकांना दाखवलं.

हातातल्या रूबीला नानाकाकांनी खाली सोडलं. तसा खडकावरून उडया मारत रूबी पुढे जाऊ लागला. अन त्याच्या पाठोपाठ नानाकाकांसह बच्चेकंपनी, रूबी एका खडकावरून दुस–या खडकावर उडया मारत होता. अन सा–यांचं लक्ष त्याच्यावर केंद्रित झालं होतं.

एका खडकावरून उडी मारताना अचानक प्राचीचा तोल गेला. ती दोन खडकांच्या मधल्या फटीत घसरली. आधारासाठी म्हणून तिनं उजवीकडे हात सरकवला अन ती चमकलीच ! तिचा हात आत गेला होता. त्या प्रचंड खडकाला आतल्या बाजूनं मोठं भगदाड कसावसा तोल सावरत प्राची त्या भगदाडात डोकावली.

'बापरे ! चक्क भुयार दिसतयं !' ती स्वतःशीच पुटपुटली. झटकन तिने वर येऊन पाहिलं. नानाकाका आणि जयेश, अँथनी रूबीसह बरेच पुढे गेले होते. हाका मारून तिनं सा-यांच लक्ष वेधल.

नानाकाका आणि अँथनी त्या खबदाडीत उतरले. "इथं भुयार असल्याची कुणाला माहिती कशी बरं नाही !" नानाकाका पुटपुटले. त्यांनी आत डोकावून पाहिलं. बाहेर उजेड असला तरी आत अंधारच होता. नानांचा एक मदतनीसही एव्हाना तिथवर येऊन पोचला होता. त्याच्याकडचा टॉर्च घेऊन नाना खाली उतरले.

टॉर्चच्या प्रकाशझोतात त्यांनी भुयाराचा अंतगर्भात पहाणी केली. "रिकामंच दिसतंय !" ते म्हणाले. "या भुयाराचा कुणी वापर केल्याचं चिन्ह दिसत नाही, पण आतमधे जाऊन शोध घेतला पाहिजे." नानाकाकांनी जाहीर केलं.

"आम्ही जाऊ आत ?" जयेश – अँथनी एदमच उद्गारले.

"नाही" नानांनी त्यांना थोपवलं. "नील" त्यांनी आपल्या मदनीसाला हाक मारली. "जरा भुयारात उतरून पहा". नाना त्याला सूचना देऊ लागले.

भुयाराच्या तोंडाकडचा भाग बराच अरूंद होता. त्यामुळं नीलला सरपटतच आत जावं लागलं. पण पुढे वाकून उभं रहाण्याइतकं भुयार प्रशस्त असल्याचं त्याच्या लक्षात आलं. बाहेर मुलांची उत्सुकता प्रचंड ताणली गेली होती.

"भुयार तसं लहानच आहे, साहेब ! आतल्या टोकाला मोठा गोल दगड आहे. भुयार पूर्ण रिकामं आहे. पण हे मात्र मला भुयारात सापडलं साहेब !" भुयाराच्या तोंडाशी येऊन नीलनं हातातली वस्तू बाहेर भिरकावली. तसे सा-यांचे डोळे विस्फारले.

पार चुरगाळलेलं ते ५५५ सिगारेटचं पाकीट होतं. नानांच्या तोंडून हलकेच शीळ निघाली.

"आणि साहेब ! तिथल्या काही खडकावर लिहीलेलं होतं... सीट नंबर आठ... असं !" अजितनं सांगितलं.

"काय ?" प्राचीच्या तोंडून आश्चर्योद्गार निघाला. आणि कुणी अडवण्यापूर्वीच ती सरपटत भुयारात शिरली. कुणालाच तिच्या वागण्याचा अर्थ कळाला नाही. प्राचीपाठोपाठ रूबीदेखील भुयारात शिरला. पण कुणाचंच तिकडे लक्ष नव्हतं. प्राची काय करतेय ते पाहण्यातच सारे गुंग झाले होते. ..अगदी नानाकाकासुध्दा !

आत शिरताच नीलच्या हातातील टॉर्च हिसकावून घेत ती पुढे जाऊ लागली. टॉर्चचा प्रकाशझोत खडकावरची अक्षरं वाचण्यासाठी पुरसा होता. दोन – तीन खडकावर तिला स्पष्ट लिहीलेलं दिसले... "सीट नं. ८ काका."

एव्हाना नानाकाका, जयू आणि अँथनीदेखील भुयारात शिरले होते. प्राची मागे फिरली. नानाकाकांच्या कमरेला तिनं मिठी मारली. हुंदक्यामुळे तिच्या तोंडून शब्द फुटत नव्हते.

"काका, पिंटू इथं होता..." ती कसंबसं म्हणाली. नानांनी हलकेच तिची पाठ थोपटली. तसं रडू आवरत प्राची सांगू लागली. "...मुंबईत घरी आम्ही गुप्तहेर नावाचा खेळ खेळायचो. त्यात प्रत्येकाला सांकेतिक नाव देतात. येताना आपण चिपळूणला उतरलो तेव्हा कंडक्टरने निघताना तुम्हाला, 'सीट नंबर आठवाले काका, चढा गाडीत ! अशी हाक मारली... आम्ही तुमचं नाव... सांकेतिक... 'सीट नं. आठ काका' ठेवलं... पिंटूला कुणीतरी पकडलं असावं म्हणून त्यानं..." प्राचीला पुढे बोलवेना.

सारा प्रकार नानाकाकांच्या ध्यानी आला.

"अग रडूं नको. पिंटू आता नक्कीच सापडेल." नानाकाकांनी तिची समजूत घातली. "आता मी तुम्हाला घरी पोचवतो. अन इन्स्पेक्टर वाघांची गाठ घेतो. ते नक्कीच त्याला शोधून काढतील." नाना मुलांना म्हणाले. आपल्या मदतनीसाला त्यांनी इन्स्पेक्टर वाघांकडे जाऊन घडामोडींची माहिती कळविण्यास सांगितलं.

बाहेर पडण्यासाठी सारे भुयाराच्या तोंडाशी पोचले, तशी जयूला रूबीची आठवण झाली. आता रूबी त्यांच्याबरोबर नव्हता.

"रूबी... रूबी..." जयेशनं हाकांचा सपाटा सुरू केला.

"प्राची आत उतरली तेव्हा तिच्या पाठोपाठ रूबी आत गेला असावा." अँथनी म्हणाला.

टॉर्चचा प्रकाशझोत फिरवत सारे पुन्हा भुयारात अंतर्भागात वळले. पण रूबीचं चिन्ह दिसत नव्हतं. टॉर्चचा प्रकाशझोत भुयाराच्या आतल्या टोकाच्या खडकावर स्थिरावला तरी रूबीचा शोध लागला नाही.

इतक्यात अँथनी सा–यांचं लक्ष वेधल. भुयाराच्या आतल्या टोकाचा हा खडक खालच्या खडकावर जिथं टेकला होता. तिथं लहानशी फट होती. आणि त्या फटीतून रूबीची शेपटी डोकावत होती. जयू त्या दिशेने धावला, तेवढयात ती शेपटीदेखील दिसेनाशी झाली !

"त्या खडकाआड पोकळी असावी !" नील नानांचा मदतनीस म्हणाला. तो खडक सरकवण्यासाठी त्यानं आपल्या पथकातील आणखी चौघांना आत बोलवलं. दरम्यान जयेशने रूबीला हाका मारणं चालूच ठेवलं होतं. पण रूबीचा त्याला प्रतिसाद मिळत नव्हता.

नील आणि इतर चौघे खडक हलवण्याच्या कामात लागले. नानाकाकांचा चेहेरा मात्र गंभीर होता. त्यांना कसलीतरी शंका सारखी जाणवत होती. कमरेच्या पिस्तुलावर त्यांचा हात सज्ज होता...

जड भासणारा खडक त्या पाचांच्या प्रयत्नाने हळूहळू सरकू लागला. पण त्याचं फारसं वजन जाणवत नसल्यानं तेही चक्रावले ! निम्मा अधिक खडक मार्गातून दूर झाला तसं समोरचं स्पष्ट झालं.

खडकाआड आणखी एक भुयार दडलं होतं. रूबी सापडला होता, पण तो एकटाच नव्हता.... त्याच्याबरोबर पिंटूही होता. ..तोसुध्दा बंधमुक्त... रूबी ऐटीत पिंटूच्या खांद्यावर बसून सा-यांच्या विस्फारलेल्या डोळयांना वेडावत होता.

αααααααααα

## १०. राजकोटात थरारनाटय

आनंदाचा आणि आश्चर्याचा पहिला भर ओसरला तशी पिंटूवर प्रश्नांची सरबत्ती झाली. नेमकं काय घडलं ते जाणून घेण्यासाठी सारे उत्सुक होते.

“हिरव्या चौकडीच्या शर्टवाल्याने मला पकडलं होतं... पिंटू सांगू लागला.

“पण त्याने तुला सोडलं कसं ?” अँथनीने विचारलं.

“सोडलं नाही. . . . , मी त्याच्या कैदेतून पळालो...” पिंटू उत्तर देता देता अचानक थांबला. समोरच्या एका खडकाकडे त्याचं लक्ष गेलं.

“नानाकाका, मला याच गुहेमधे सुरूवातीला ठेवलं होतं.” तो अचानक ओरडला.

“हो, ते आम्हाला कळलं. तू खडकांवर ‘सीट नं. आठ काका’ असं लिहून ठेवल्यामुळे.” प्राची म्हणाली.

“आणि नंतर त्यांनी तुला भुयाराच्या आतल्या भागात बंद करून हा दगड सरकवला.” अँथनी म्हणाला.

“छे , छे ! त्यांनी नंतर मला दुस-या खजिन्याच्या गुहेत बंद केलं होतं. !” पिंटू म्हणाला.

“खजिन्याची गुहा !” जयेश, अँथनी आणि प्राची एकदमच ओरडले.

पिंटूच्या उत्तरामधून कुणालाच अर्थबोध होत नव्हता.

“मला एक सांग प्रणेश, इथे एकूण कितं माणसं होती ? आणि आता ती कुठे आहेत ?” नानाकाकांनी विचारलं.

“दोघंच होते ते. एक हिरवी चौकडीवाला आणि त्याच्याबरोबर दुसरा जॉन नावाचा माणूस. मला त्या दुस-या गुहेत बंद करून ते पहाटेच गेले. . . . आणि रात्री उशिरा परत येणार आहेत.” पिंटू म्हणाला.

पिंटूकडून ही माहिती मिळताच नानाकाकांनी काही महत्त्वाच्या हालचाली केल्या. पिंटूच्या सुटकेची वार्ता गुप्त राखण्याची त्यांनी आपल्या मदतनीसांना सूचना दिली. "पिंटू सापडला नाही असं समजून तुम्ही शोधकार्याचं नाटक चालू ठेवा. या जागेवर दुरून टेहेळणीदेखील चालू असू दे ! त्यांना गाफील ठेवून आपण नक्कीच पकडू शकू." ते नीलला म्हणाले.

"चला रे पोरांनो ! आपल्याला पोलिसस्टेशनवर जाऊन इन्स्पेक्टर वाघांना गाठलं पाहिजे. पण त्या आःधी पिंटू च्या पोटपूजेची सोय केली पाहिजे मला वाटतं तो उपाशीच असावा!" नानाकाका म्हणाले.

भुयारातून सारे बाहेर आले. दूरवर चिटपाखरूदेखील नव्हतं. समुद्र नेहेमीसारखाच शांत होता. नानाकाकांच्या पथकातील माणसं दुरवर पांगली. एकजण खडकाआड लपून टेहेळणीचं काम करू लागला. नाना, जयेश, प्राची, अँथनी अन रूबीसह पिंटू सारे जीपमधून पोलिस स्टेशनच्या दिशेने निघाले.

जीपमध्ये पिंटू एकाच वेळी समोरच्या अन्न पदार्थांवर ताव मारण्याचं आणि सर्वांच्या प्रश्नांना उत्तरं देण्याचं – अशी दोन्ही काम करत होता. पिंटूच्या उत्तरांमधून हळूहळू चित्र स्पष्ट होऊ लागलं. मुलांच्या तोंडून मधूनच आश्चर्योद्‌गार निघत होते. प्राचीच डोळयात प्रणेशबद्दलच्या कौतुकाचे भाव मावत नव्हते. नानाही लक्ष देऊन सारं ऐकत होते. मधूनमधून त्यांना हसूदेखील फुटत होतं.

पिंटूची कहाणी सांगून संपली तेव्हा नानाकाकांनी प्रश्न विचारायला सुरूवात केली. आपण केवढया मोठया कारस्थानाचा छडा लावला आहे याची पिंटूला कल्पनादेखील नव्हती ! पण एक मोठं रहस्य उलगडल्याच्या खूषीत नाना होते. जीप थांबली तसे सारे भानावर आले. पोलिसस्टेशन आलं होतं. मुलांनी जीपमधून उडया ठोकल्या.

चीफ कस्टम ऑफिसर सामंत भेटायला आले हे ऐकून इन्स्पेक्टर वाघ चकित झाले पण त्यापेक्षा अधिक आश्चर्याचा धक्का त्यांना बसला तो पिंटूला पाहून !

"ओ हो ! बाल – डिटेक्टिव्ह तुम्ही होता कुठे ?... आमची झोप पार उडवून टाकलीत की ?" इन्स्पेक्टर वाघ उद्‌गारले.

"तो पेद्रू परेराच्या साथीदारांच्या कैदेत होता. तिथून त्यानं सुटका करून घेतली !" नानाकाका म्हणाले.

"पिंटूच्या हकीकतीतून वरीच महत्त्वपूर्ण माहिती हाताशी आलीय, पण मी तुम्हाला ती संगतवार सांगतो." नानाकाका म्हणाले. तशी इन्स्पेक्टर वाघ आणि त्यांचे सहकारी लक्ष देऊन ऐकू लागले. मुलंदेखील सरसावून बसली. पिंटूच्या कैदेची कथा त्यांना कळली होती. पण नानाकाकांचं कथा सांगण्याचं कसबही त्यांना ठाऊक होतं !

"राजकोटाच्या खडकांची रांग सुरू झाली तसा अँथनी, जयेश – प्राचीची वाट पहात तिथंच थांबला आणि रूबीसह पिंटू पुढे सटकला. हे तुम्हाला माहीत आहेच." नानाकाका सांगू लागले.

"रूबी पाठोपाठ उडया मारत प्रणेशही पुढे चालला होता. आपल्याच नादात असलेल्या प्रणेशला आपण बरंच अंतर तोडून आतवर आलो हे कळलंच नाही. अचानक त्याची नजर रूबीच्या पकडीत असलेल्या वस्तूकडे गेली. ते ५५५ चं सिगारेटचं पाकीट असल्याचं त्याच्या लक्षात आलं. ते सिगारेटचं पाकीट आणि हिरवी चौकडीवाला त्यांचं समीकरण त्याच्या डोक्यात पक्क बसलं होतं. त्यामुळे अनपेक्षित असा हा शोध लागताच ही बातमी जयेश – अँथनी – प्राचीच्या कानी घालण्यास तो मागे वळला. पण तेवढयात याच हिरवी चौकडीवाल्या माणसाला त्यानं खडकांच्या भगदाडीतून बाहेर येताना पाहिलं तसा तो बावरला. त्याच्या तोंडून अस्फूट किंचाळी निघाली. हिरवी चौकडीवाला सावध झाला, या मुलानं बहुदा भुयारातून बाहेर येताना आपल्याला पाहिलं असावं असं त्याला वाटलं. त्यानं झटकन मनाशी निर्णय घेतला. अन पिंटूची भुयारात रवानगी झाली..."

"भुयारात ढकलला जाण्यापूर्वी पिंटूनं मदतीसाठी दूरवर पाहिलं, पण कसलाच आधार त्याला दिसला नाही, तसा तो निराश झाला..... भुयारात हिरव्या चौकडीवाल्याचा साथीदारही या कैद्याला पाहून वैतागला. इतके दिवस त्या ओसाड जागी फिरकलं नव्हतं. त्यामुळ त्यांच्या कामात कधी अडथळा आला नव्हता. त्यांच्या या अडयाची बातमी गुप्तच राहिली होती. अन आता हा पोरटा कडमडला. त्या दोघांच्या संभाषणातून हिरव्या चौकडीवाल्याचं नाव रिंकी असल्याचं पिंटूला कळलं...

"हा रिंकी म्हणजे पेद्रू परेराचा उजव हात, रिंकी रस्किन्हा तर नव्हे ?" इन्स्पेक्टर वाघ चमकून म्हणाले.

"हो, बहुदा तोच असावा असं मला वाटतं." नानाकाका म्हणाले.

कथेत व्यत्यय आल्याची नाराजी बालचमूंच्या चेहे–यावर दिसत होती. तिकडे दुर्लक्ष करत तो पुढं सांगू लागले. "रिंकी आणि त्याचा साथीदार जॉन अशा दोघांचच वास्तव्य त्या भुयारात

असल्याचं पिंटूच्या लवकरच लक्षात आलं. दोघांनाही पिंटूच्या धडपडेगिरीची कल्पना नसल्याने त्यांनी पिंटूच्या तोंडावर फडका तेवढा बांधला आणि त्याच्या कमरेला दोरी बांधून दुसरं टोक जॉननं खडकाच्या खोबणीत अडकवलं. त्यांच्यापुरता पिंटूचा बंदोबस्त झाला होता. बंदी बनल्यानंतर काही काळ पिंटू शांतच बसला...... आता आपण पुन्हा घरी पोहोचू शकणार नाही याकल्पनेनं तो सुन्न झाला. पण हळूहळू त्याचं विचारचक्र चालू झालं. सुटकेचा मार्ग शोधण्याचा तो विचार करू लागला..... गुहेच्या तोंडाशी मोठा दगड ! गुहेचं आतलं टोक तर बंदच दिसत होतं. कमरेला दोरी बांधलेली. अन दोन्ही बाजूला हे राक्षस रिंकी आणि जॉन. सुटका अशक्यच होती. रिंकी आणि जॉन काही गप्प नव्हते. तरी नशीब त्यांनी पिंटूला मारहाण केली नाही की काही प्रश्न विचारले नाहीत. त्यांच्यालेखी पिंटू केवळ वाट चुकून तिथं कडमडलेला पोरगा होता आणि त्याला कैदेत टाकून त्यांनी भुयाराची वार्ता गुप्त राखण्यात यश मिळवलं होतं. आत येताना रिंकी नं खडक ओढून घेऊन गुहेचं तोंड बंद केल्यानं बाहेरचा आवाजदेखील आत शिरू शकत नव्हता. म्हणनूच पिंटूच्या मनाची निराशा वाढत चालली. अचानक अंगाला काही तरी टोचल्याची जाणीव झाली, तसा तो चमकला.... खिशात कोणती तरी टोकदार वस्तू असल्याचं त्याच्या लक्षात आलं. खिशात हात घालून त्यानं ती बाहेर काढली. किल्ल्यावर जमा केलेल्या टोकदार काटयांपैकी तो काटा होता. त्याचा वापर लिहीण्यासाठी करता येतो, याची त्याला कल्पना होती.... झटकन त्याला कल्पना सुचली. आपला शोध घेत कुणी इथंवर आलं, तर त्याला हा दुवा मदत करू शकेल ! त्यानं विचार केला, अन फारशी हालचाल न करता खडकावर तो लिहू लागला, 'सीट नं. आठ काका' प्राचीला याचा अर्थ समजेल याची मला खात्री होती. रिंकी चं पिंटूच्या लिहिण्याकडे लक्ष गेल. पण नानाकाकांचं हे सांकितिक नाव त्याला कुठनं कळणार ? अक्कल जरा कमीच असावी पोराला. त्यानं विचार केला अन दुर्लक्ष केले...

"बराच वेळ झाला... एव्हाना रात्र झाली असावी. पिंटूच्या ध्यानात आलं. त्याला भूक लागली होती पण डोळे पेंगुळले होते. कान मात्र जागे होते. रिंकी आणि जॉनच्या संभाषणातून दुस–या दिवशी कोणता तरी देवघेवीचा व्यवहार होणार आहे हे पिंटूला कळलं आणि एकदा त्याचं काम पार पडलं म्हणजे ते आपली सुटका करतील हे त्याला कळलं, तसा तो शांतपणे झोपी गेला...

"पिंटूला जाग आली, तेव्हा तो एक लहानशा होडीत होता आपण बंधनात असल्याची त्याला जाणीव झाली. होडीत तो एकटाच नव्हता. रिंकी आणि जॉन देखील होडीत होते. अंधारात डोळे

फाडूफाडून पिंटूने पाहण्याचा प्रयत्न केला. पण आपण नेमके कोणत्या भागात चाललो आहोत याचा त्याला अंदाज येईना. तशी त्याच्या मनातली भीती वाढू लागली. आता हातपायही बांधले गेले असल्यानं त्याला भिती वाढू लागली. आता हातपायही बांधले गेले असल्यानं त्याला फारशी हालचालही करता येत नव्हती...

"थोडया वेळानं होडी थांबली. जॉननं हातातली वल्ही ठेवली आणि पिंटूचं मुटकुळं खांद्यावर घेतलं होतं. पण त्याचा मेंदू टक्क जागा होता. परिस्थितीचा अंदाज घेत होता. खडकाळ भागातून ते चालले होते. खडकांच्या रांगातून रिंकी पुढे झाला आणि त्यानं एक दगड ढकलला.

'ओ, हो ! आपण पुन्हा त्याच गुहेत आलो. पण मग ही होडी कशी कडमडली !' पिंटुनं विचार केला. भुयारात शिरताच पिंटूचा भुयाराचं वेगळेपण जाणवलं. त्या भुयारापेक्षा हे भुयार प्रशस्त होतं. शिवाय या भुयारात आतल्या टोकाला लाकडी पेटया रचून ठेवल्या होत्या. भुयारात पोचताच रिंकी आणि जॉनची बडबड चालू झाली. एव्हाना पहाट झाली असल्याचं पिंटूला त्यांच्या बोलण्यातून कळून चुकलं. हळूहळू गुहेत प्रकाश जाणवू लागला. तसे पिंटूला तिथंच ठेवून गुहेच्या तोंडाचा दगड पूर्ववत सरकवून दोघंही बाहेर पडले...

"मध्यरात्रीपर्यंत दोघंही इकडे फिरकणार नाहीत हे पिंटूला त्यांच्या संभाषणातून समजलं होतं. केळी खायला देऊन पिंटूच्या भूकेचीदेखील व्यवस्था जाण्यापूर्वी केली होती. पण खाणं संपताच हात पुन्हा बांधून गेल्यानं पिंटू वैतागला होता. भुयारातल्या लाकडी पेटया पहाताच त्याला कल्पना सुचली. सरपटत तो त्या दिशेने निघाला. पेटयांपाशी पोचताच त्यानं हाताला बांधलेल्या दो–या पेटीला ठोकलेल्या धारदार पञ्यावर फिरवायला सुरूवात केली. हातांवर ओरखडे उठले खरे. पण हात मात्र मोकळे झाले. लगेच पायाच्या दो–यांवरही त्यानं तोच प्रयोग केला. हातपाय मोकळे होताच पिंटू भुयाराच्या तोंडाकडे धावला. तोंडाशी ठेवलेला दगड हलवण्याचा खूप प्रयत्न केला. तरी त्याच्या पदरी निराशाच पडली."

" निराश होऊन तो पुन्हा या पेटयांच्या ढिगा – यापाशी आला. 'काय बरं असावं या पेटयांमधे?' तो विचार करू लागला. पेटीवरच्या पञ्याच्या पट्ट्यामुळे पेटी उघडणं कठिणच होतं. रिंकी आणि जॉन स्मगलर असल्याचं त्याला ठाऊक होतचं. कदाचित त्यांना चाचा लफितचा खाजिना सापडला असावा. अन तोच कदाचित त्यांनी त्या पेटयांमधे भरून ठेवला असावा.... पिंटूने विचार केला."

"धडपडत तो पेटयांच्या ढिगा-यावर चढला. पण त्याची परिणती पडण्यातच झाली. पेटयांचा ढिगारा आणि गुहेचं आतलं बंद टोक त्यांच्या मधल्या पोकळीत तो पडला.

त्या अरूंद पोकळीत पिंटू उभं राहण्याचा प्रयत्न करू लागला. उभं राहताना त्याचं डोकं वरच्या खडकाला आपटलं. तसा पायाखालचा दगडही हलू लागला. आधारासाठी पिंटू पाठीमागच्या दगडाला टेकला. तसा तो प्रचंड दगड सरकू लागला. पाठीमागचा दगड सरकून एक मोठी फट तयार झाली होती. बेधडक पिंटू त्या फटीतून आत शिरला ! ही तर दुसरी गुहा दिसत होती... कदाचित इथून बाहेर पडता येईल. पिंटूनं विचार केला आणि तो सरळ पुढे चालू लागला...

"या भुयारात तसा फारसा अंधार नव्हता. मधूनच छतातून प्रकाशाची तिरीप येई. पण बाहेर पडण्याचा मार्ग मात्र दिसत नव्हता. बराच वेळ पिंटू चालत राहिला. गुहादेखील वेडयावाकडया वळणाआड दूरवर पसरली होती. अखेर एका मोठया दगडापाशी पिंटू येऊन पोचला. हे गुहेचं अखेरचं बंद टोक होतं...

"निराश होऊन पिंटू आपल्या बंदीखान्याच्या दिशेने परत फिरला. सुटकेसाठी आता कोणता मार्ग शोधावा याचा तो विचार करू लागला. पण विचार करायला त्याला फारसा वेळ मिळाला नाही. अचानक मागे हालचाल जाणवली म्हणून तो वळला आणि समोरचं दृश्य पाहून थक्क झाला. रूबी त्याच्या दिशेनं पळत येत होता अन पिंटूपाशी येताच रूबीनं त्यांच्या खांद्यावर झेप घेतली...

"पिंटू, रूबीला कुरवाळू लागला, 'हा इथं कसा आला ?' मी चालत कुठवर आलो ? इथून सुटका होऊ शकेल ?' शेकडो प्रश्न पिंटूच्या मनात उठू लागले. . . . रूबी ज्या दिशेनं आला, तिकडे त्याने पाहिले. छे, रूबी तर गुहेचं आतलं टोक असणा-या बंद खडकाआडून आला होता. कसं शक्य आहे ? पिंटू स्तब्ध झाला. क्षण, दोन क्षण असेच गेले आणि पिंटुला आश्चर्याचा आखणी एक धक्का बसला. गुहेच्या आतल्या टोकाचा खडक आता हलू लागला होता. निम्माअधिक सरकला, तसं समोरचं चित्र स्पष्ट झालं. विस्फारलेल्या डोळयांनी मी जयेश, अँथनी, प्राची. . . आणि शिवाय आणखी दोन - चार डोकी समोरून त्याच्याकडे पाहात होती." नानाकाकांचं कथन संपलं.

क्षणभर सारे स्तब्ध होते. क्षणभरानं इन्स्पेक्टर वाघांनी टाळया वाजवल्या, तसे सारे भानावर आले. "या टाळया तुमच्या कथनशैलीला दाद देण्यासाठी होत्या, सामंतसाहेब." इन्स्पेक्टर वाघ म्हणाले, "या आमच्या छोटया डिटेक्टिव्हसाठी नुसत्या टाळया पुरणार नाहीत. त्याची शिफारस

राष्ट्रपती पदकासाठी आम्ही नक्कीच करू !" इन्स्पेक्टर वाघ पिंटूचं कौतुक करत म्हणाले.

प्राचीच्या डोळयात पिंटूबद्दलचा अभिमान मावत नव्हता. कौतुकाच्या वर्षावात पिंटू पार बूडून गेला होता. आपण काही ग्रेट केलंय असं त्याला वाटत नव्हत. तसं त्यानं बोलूनही दाखवलं. मुलांची अखंड बडबड चालूच होती.

दुपारचे दोन वाजले होते. नानाकाकांनी जयेश, प्राची, अँथनी आणि रूबीची घरी रवानगी केली. पिंटूच्या सुटकेची वार्ता गुप्त राखण्याची त्यांनी मुलांना सूचना केली. त्यांचं आणि इन्स्पेक्टर वाघांचं गुप्त खलबत चालू होतं. पिंटू देखील पोलिस स्टेशनवरच होता.

सकाळी आपण राजकोटात गेल्यावर आपल्याला जे काही जाणवलं ते नानाकाका इन्स्पेक्टर वाघांना सांगत होते. त्यांच्या डोक्यात घोळणा-या प्लॅनबद्दल त्यांनी वाघांना सांगितलं. पेद्रु परेरा आणि त्याचे साथीदार पकडणे आवश्यक होतं आणि त्या कामी पिंटूची आणखीही मदत ते घेणार होते. राजकोटच्या भुयारांच्या शोधाने घटनांना वेगळंच वळण मिळालं होतं. दुपारभर चर्चा करून इन्स्पेक्टर वाघांनी काही महत्त्वाच्या हालचाली केल्या.

राजकोटात जे काही घडलं, ती केवळ नांदीच होती. खरं थरारनाटय अजून घडायचं होतं.

αααααααααα

## ११. मोहीम फत्ते

कर्र... र... टिंग...

मनगटावरच्या घडयाळाचा अलार्म वाजला तसा रिंकी रस्कीन्हा जागा झाला. रात्रीचे साडेअकरा वाजले होते. जॉनला त्यानं जागं केलं. दोघेही होडीतून बाहेर पडले. चोहीकडे निस्तब्ध शांतता पसरली होती. सागराच्या लाटांचाच आवाज काय तो शांततेचा भंग करीत होता.

दोघे किना-यावच्या खडकांच्या रांगांमधून चालू लागले. जॉनच्या हातात टॉर्च होता. पण त्याचा तो फारसा वापर करत नव्हता. ही त्याच्या पायाखालची वाट होती. शिवाय टॉर्च पेटवण्यात धोकाही होता. नेहेमीच्या खडकापाशी ते पोचले. जॉननं उजव्या बाजूच्या खडकाला धक्का दिला. तसा समोरचा खडक सरकू लागला.....टॉर्चच्या प्रकाशात त्यानं गुहेचा अंतर्भाग तपासला. सारं काही ‘जैसे थे’ होतं. कोप-यात झोपलेल्या पिंटुकडे जॉनचं लक्ष गेलं.

“पोरगा झोपलाय !” तो म्हणाला.

“हूं ! सुटकेची काही धडपड केलेली दिसत नाहीये त्याने !” रिंकी म्हणाला. “अक्कल थोडी कमीच दिसतेय पोराला !” त्यांन शेरा मारला...

“तो कसला पळतोय हातपाय असे बांधून ठेवल्यावर ! पण मला वाटतं उगीच आपण ही ब्याद गळयात घेतली!” जॉन.

“हो, उगीच तो अड्डा साडून या अड्डयावर यावं लागलं आपल्याला.” रिंकी.

“अरे कशाला काळजी करतोयस ! बॉस येईलच एवढयात ! अर्ध्या तासात काम उरकून आपण रिकामे होऊ !” जॉन

“होय, उस्मानदेखील बरोबर येणार आहे. बरं झालं ही कामगिरी आज संपतेय. पंधरा दिवस हा एकच शर्ट अंगावर घालून मी अगदी वैतागून गेलोय !” रिंकी म्हणाला.

रिंकी चे शब्द विरतात न विरतात तोच दूरवरून लाँचचा आवाज ऐकू येऊ लागला. बॉस आल्याची खूण पटली. तसे दोघेही पेटयांच्या ढिगा–याकडे वळले. पेटया उचलण्यासाठी दोघेही खाली वाकले. पण ती संधी त्यांना मिळलीच नाही. आपण पकडले गेलो हे त्यांना कळलं तेव्हा फार उशीर झाला होता.

इन्स्पेक्टर वाघांनी पेटवलेल्या टॉर्चच्या प्रकाशात आपण पेटा–यांच्या ढिगा–याआड दडलेल्या पोलीसांच्या गराडयात आहोत हे रिंकी , जॉनला कळून चुकलं. त्यांच्या चेह–यावर आश्चर्य होतं, पण ते आश्चर्य इथं पोलीस कसे पोहोचले, या प्रश्नाचं होतं की, आपण बंद समजत असलेल्या गुहेआड आणखी एक गुहा आहे हे आपल्याला आजवर कधी कळलं कसं नाही, या प्रश्नांमुळं होतं. हे सांगता येणं कठीण आहे...

झोपेचं सोंग घेतलेल्या पिंटूने आपल्या हातापायावर ठेवलेल्या दो–यांचे तुकडे झटकून टाकले, आणि तो उठून बसला. रिंकी आणि जॉनचा बंदोबस्त करून इन्स्पेक्टर वाघदेखील आपल्या सहका–यांसह पेटा–यांच्या ढिगा–यांआडून बाहेर आले. पिंटूच्या पाठीवरून त्यांनी मायेने हात फिरवला. त्याच्याचमुळे आज रिंकी रस्कीन्हा आणि जॉन सारख्या कुख्यात स्मगलर्सना पकडणं शक्य झालं होतं. आता ते पेद्रू परेराची वाट पाहात होते...

चार – पाच मिनिटं अशीच गेली. लाँचचा आवाज येत नव्हता. तो किना–यावर उतरून इकडेच येत असावा. इन्स्पेक्टर वाघांनी विचार केला. पण अचानक पुन्हा लाँचचा आवाज येऊ तसे ते दचकले...

“त्यांना संशय आलेला दिसतोय !” ते पुटपुटले. इन्स्पेक्टर वाघांचे सहकारी बाहेर पडले. किना–यापासून लाँच फारशी दूर नव्हती. पण ती वेगाने दूर चालली होती. पेद्रू परेराला गाठणं शक्य नव्हत. तत्काळ इन्स्पेक्टर वाघांनी वायरलेस ट्रान्समीटरव्दारा कस्टम ऑफिसर सामंतांशी संपर्क साधला.

खास पोलिस तैनातीत पिंटूची स्वारी घरी पोहोचली तेव्हा रात्रीचे साडेबारा वाजले होते. पण घरी सारे जागेच होते !

पिंटूनं घडाघड सारा वृत्तांत सांगण्यास सुरूवात केली जयेश, प्राची आणि काकू सारी मंडळी उत्सुकतेने ऐकत होती.

“सकाळी तुम्हाला ज्या गुहेचा शोध लागला, त्या मार्गानं मी, वाघकाका आणि बरेचसे पोलिस

असे सारे आत गेलो आणि मधलं भुयार पार करून खजिन्याच्या भुयारात पोचलो. तिथं वाघकाकांनी मला झोपेचं सोंग घेऊन रहायला सांगितलं. माझ्या हाता – पायावर दो–याचें वेढे ठेवण्यात आले. त्यामुळे हिरव्या चौकडीवाल्याला माझे हात पाय पूर्वीसारखे बांधलेले वाटले असावे." पिंटू सांगत होता.

"तुला भिती नाही वाटली ?" प्राचीनं विचारलं.

"छे ! वाघकाका पोलिसांसह मधल्या भुयारात होतेच की, बरोबर. शिवाय नानाकाकाही एकदा येऊन धीर देऊन त्यांच्या ऑफिसमधे गेले."

"आता रात्री दोघेही म्हणजे हिरवा चौकडीवाला रिंकी आणि जॉन गुहेत आले..."

"...आणि आयतेच जाळयात सापडले." जयेशने पिंटूचं वाक्य पुर्ण केलं.

"हो, ना ! त्यांना काहीच कल्पना आली नाही. त्यांचा बॉस, तो परेरा मात्र पळाला..."

"...नाही तो पळून जाऊ शकला नाही. परेरा आणि त्याच्या साथीदार उस्मान दोघांनाही पकडण्यात आले !" या वेळी नानाकाकांनी पिंटूचं वाक्य तोडलं तसं चमकून सा–यांनी आवाजाच्या दिशेने पाहिलं.

दारात नानाकाका उभे होते.

"इन्स्पेक्टर वाघांनी माझ्याशी संपर्क साधला आणि परेराच्या पलायनाची माहिती दिली. मग आमच्या मोटर – बोट्सनी परेराच्या लॉंचचा पाठलाग केला. आणि त्याला घेरलं. तसं शरण येण्याशिवाय दुसरा पर्याय त्याच्यासमोर नव्हता." नानांनी 'मोहीम फत्ते' झाल्याची वार्ता दिली.

"या मोहिमेचं बरचसं श्रेय तुम्हा पोरांना जातं." नाना म्हणाले, "त्या हिरव्या चौकडीवाल्याबद्दल पिंटूकडून माहिती मिळाली, तिथंच घटनांनी वेग घेतला !" पिंटूचं नानाकाका कौतुक करू लागले.

"पण काका, तो रिंकी , कायम हिरव्या चौकडीचा शर्ट का वापरायचा ते कळलं का ?" प्राचीने विचारले.

"हो, पिंटूकडून आम्हाला त्याच्या शर्टचा तुकडा मिळाला तेव्हाच आम्हाला संशय आला होता आणि आमचा कयास खराही ठरला. त्याच्या शर्टला आतल्या बाजूने अस्तर होतं. त्याची झडती घेताच लाखो रूपये किंमतीचं हेरॉईन हे अमली द्रव्य त्याच्या त्या शर्टमधे बेमालूमपणे लपवण्यात आल्याचं उघडकीस आलं !"

“हा लाख मोलाचा शर्ट रिंकी सदैव आपल्या अंगावरच वागवत होता ! आज हा शर्ट तो उस्मानकडे सुपूर्द करणार होता. पेद्रू परेरा त्याच व्यवहारासाठी इथं येत होता !” नानांनी खुलासा केला.

“आणि त्या पेटयांमधे, गुहेमधल्या... काय होतं हो नाना ?” पिंटूनं विचारलं.

“ओह ! त्यात काही चाचा लफितचा खजिना नव्हता बरं का पिंटोबा ! त्यात शस्त्रास्त्रं भरली होती. बंदुका, बॉम्ब्ज् वगैरे ते पेटारेदेखील लाँचमधून दुसरीकडे नेण्यात येणार होते.” नानांनी माहिती दिली.

“....या साऱ्या प्रकरणात अनपेक्षितपणे शिवकालीन भुयारांचा शोध लागला.” ते खुषीत म्हणाले. मुलांचे प्रश्न चालूच होते. नानादेखील त्यांच्या प्रश्नांना उत्तर देण्यात रंगले होते.

घडयाळानं दोनचे ठोके दिले, तसे सारे भानावर आले. बच्चेकंपनीला नानांनी झोपी जाण्याची ऑर्डर दिली. दिवा बंद करताना नानाकाकांचं लक्ष कॅलेंडरकडे गेलं तसे ते चमकले.

“अरे पिंटू, प्राची, तुम्ही विसरलात की काय ?” ते एकदम ओरडले, “परवा तुमच्या सुट्टीचा शेवटचा दिवस. म्हणजे उद्या सकाळी तुम्हाला मुंबईला निघालं पाहिजे”.

सुट्टीचे पाच दिवस इथे कसे कधी संपले ते प्राची – पिंटूला कळलंच नाही ! आता नानांनी आठवण करून देताच त्यांचे चेहरे खट्टू झाले. ही सुट्टी संपूच नये असं त्यांना वाटत होतं.

“अरे असं वाईट का वाटून घेताय ? आता जेव्हा मे महिन्याची सुट्टी सुरू होईल, तेव्हा महिन्याभरासाठीच या इकडे !” काकूंनी त्यांची समजूत घातली.

पण त्या रात्री ना पिंटू, प्राचीला नीट झोप लागली. ना जयेशला ! अंथरूणावर पडल्या पडल्या त्यांच्या गप्पा चालू होत्या. विषय अनेक होते आणि वेळ फार कमी. पहाटे केव्हा तरी मुलं झोपी गेली. पण त्यांना फारशी झोप मिळाली नाही. साडेसहाच्या गजराने त्यांना जागं केलं.

“गाडी सकाळी साडेआठला निघते.” नानाकाका म्हणाले.

इथल्या व्यापामुळे नानाकाकांना प्रणेश, प्राचीला पोचवायला मुंबईपर्यंत जाणं शक्य नव्हत. त्यामुळे प्रणेश, प्राचीला एकटयाने प्रवास करावा लागणार होता.

“सांभाळून जा रे ! संध्याकाळी मुंबईला पोचल्यावर तुमचे बाबा बॉम्बे सेंट्रलला तुम्हाला उतरून घ्यायला येतीलच !” नानाकाकू सारख्या सूचना देत होत्या.

पण पिंटूने या वेळी त्यांची मोजदाद केली नाही.

पिंटू – प्राचीला निरोप देण्यासाठी नानाकाका, काकू, जयेश, अँथनी, इन्स्पेक्टर वाघ आणि हो रूबीसुध्दा – सारे बसस्टँडवर आले होते.

पुढल्या सुट्टीत नक्की येण्याचं प्रॉमिस जयूने पिंटू – प्राचीकडून घेतलं. अँथनीनं आपल्याकडचा शंख पिंटू – प्राचीला जाताना भेट म्हनून दिला.

"मुंबईला तुम्ही पोचण्यापूर्वीच वर्तमानपत्रांमधून तुमच्या कार्याची प्रसिध्दी झालेली असेल !" इन्स्पेक्टर वाघ पिंटू – प्राचीला म्हणाले.

नानाकाका आणि नानाकाकूंचे डोळे पाणावले होते. बसमधे शिरताच पिंटूनं खिडकीकडची जागा पटकावली. पण या वेळी प्राची त्याच्याशी भांडली नाही. बस सुरू होताच सारी मंडळी दृष्टिआड होईतो प्राची मागे पहात होती.

पिंटूला मात्र झोप येऊ लागली.

"प्राचीताई, चिपळूण आलं की मला जागं कर !" तो प्राचीला म्हणला.

"का रे ?" तिनं विचारलं.

"मला तो चांदण्यांचा समुद्र बघायचा आहे." तो म्हणाला.

"म्हणजे ते दिवे गं ! . . .येताना आपण पाहिले." तिच्या प्रश्नार्थक चेहे–याकडे पाहात त्याने खुलासा केला आणि झोपी गेला.

"बुद्दू !" प्राची स्वतःशीच पुटपुटली. "बस चिपळूणला पोचेल तेव्हा भर दुपार असेल." तिच्या मनात विचार आला. पण ती काही बोलली नाही.

तिच्या डोळयातून कौतुकाचेच भाव बरसत होते.

αααααααααα